# नवभारत

सप्टेंबर २०११

कौरवपांडवांमधले द्यूत :
युधिष्ठिराचे उत्तरदायित्व (पूर्वार्ध)

जागतिकीकरण

भारत-पाक शांतिवार्ता :
आश्वासक भवितव्याकडे वाटचाल

अडोळी येथील प्रथम वैदर्भीय
मराठी समाधि लेख

मर्ढेकरांची महात्मता
(पुस्तक-परीक्षण)

वाचकांचा पत्रव्यवहार

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्‌मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**






प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६४। अंक १२। सप्टेंबर २०११
भाद्रपद/आश्विन शके १९३३
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.









अनुक्रमणिका

# नवभारत

## सप्टेंबर २०११

## अनुक्रमणिका

# कौरवपांडवांमधले द्यूत : युधिष्ठिराचे उत्तरदायित्व (पूर्वार्ध)

अरुण विनायक जातेगांवकर,
वासंती अरुण जातेगांवकर.

द्यूत व दुर्योधनवध हे कौरव–पांडवांच्या कथेतले महत्त्वाचे प्रसंग आहेत. किंबहुना, ती कथा सभापर्वात वर्णिलेल्या द्यूतापासून सुरू होते आणि शल्यपर्वात वर्णिलेल्या दुर्योधनवधाने संपते, असे म्हटल्यास फारसे चुकणार नाही. प्रस्तुत लेख कौरव–पांडवांमधल्या द्यूता-संबंधीच्या एका प्रश्नाविषयी आहे. तो प्रश्न असा : द्यूताच्या प्रसंगी घडलेल्या दोषास्पद गोष्टींच्या उत्तरदायित्वात युधिष्ठिराचा काही वाटा आहे का?[१]

व्यासांनी आपल्यासमोर उभा केलेला युधिष्ठिर सत्प्रवृत्त आहे हे निर्विवाद. किंबहुना, सत्प्रवृत्त गृहस्थ कसा असतो, त्याची युधिष्ठिर ही व्यासांची व्याख्या आहे, असे म्हणता येते. तथापि, सत्प्रवृत्त असला तरी तो सदोष आहे असे दाखवताना व्यासांना काही अडलेले नाही. युधिष्ठिराच्या हातून दोषास्पद गोष्टी घडल्याचे कथेत जे प्रसंग व्यासांनी घातले आहेत त्यांतला सर्वांत नाट्यपूर्ण व कथेच्या दृष्टीने सर्वांत महत्त्वाचा प्रसंग आहे, द्यूत. युधिष्ठिर कौरवांशी द्यूत खेळायला गेला होता. तेव्हा त्याला फसवून कौरवांनी पांडवांचे राज्य हिरावून घेतले आणि त्या प्रसंगी त्यांनी द्रौपदीची कुरुसंसदेत विटंबना केली, हे आपल्या सर्वांना माहीत असते. तथापि, त्या प्रसंगी युधिष्ठिराच्या हातून काही दोषास्पद घडल्याचे व्यासांनी कथेत गुंफले आहे, हे आपल्यापर्यंत सामान्यतः पोचत नाही – निदान, स्पष्टपणे पोचत नाही. महाभारतातल्या प्रसंगांविषयी आपल्यापर्यंत पोचणाऱ्या गोष्टी सामान्यतः अशा प्रकारे लिहिलेल्या असतात की, पांडव संपूर्णतः गोरे आणि कौरव संपूर्णतः काळे असल्याचे व्यासांनी दाखविले आहे, असा आपला समज व्हावा. म्हणूनच, व्यासांनी कथेत घातलेल्या एखाद्या प्रसंगात एखाद्या पांडवाच्या वागण्याविषयी आपल्या मनात किंतू निर्माण होईल असे काही असले, तर ते वगळण्याला (किंवा, त्याला संहितेशी सुसगंत नसलेली कलाटणी देण्याला) मागेपुढे पाहिले जात नाही.[२] उदाहरणार्थ, द्यूतातल्या युधिष्ठिराच्या सहभागात काहीतरी क्षात्रधर्म भरलेला आहे, हे आपल्या सर्वांच्या कानी आलेले असते. तथापि, द्यूताच्या संबंधात व्यासांनी युधिष्ठिराच्या स्वतःच्या तोंडी 'माझेच चुकले ' असा एक कबुलीजबाब घातला आहे, किंवा द्यूतातल्या त्याच्या सहभागावरून त्याच्यावर पांडवपक्षातल्या प्रमुख कथापात्रांनी वेगवेगळ्या वेळी मोठा ठपका ठेवल्याचे व्यासांनी कथेत घातले आहे, हे माहीत असलेला वाचक विरळा. द्यूताच्या प्रसंगी घडलेल्या दोषास्पद गोष्टींच्या उत्तरदायित्वात कौरवांचा मोठा वाटा आहे, हे उघड आहे; तथापि, आमच्या मते, त्यात युधि-ष्ठिराचा तेवढाच मोठा वाटा असल्याचे व्यासांना अभिप्रेत आहे. आमचे मत सकारण मांडणे हा प्रस्तुत लेखाचा एक मुख्य उद्देश आहे. त्याबरोबरच, द्यूतातल्या युधिष्ठिराच्या सहभागाविषयी संहितेत असलेल्या सर्व गोष्टी वाचकांसमोर निःपक्षपातीपणे मांडणे आणि त्या संदर्भात व्यासांनी आपल्यावर सोडून दिलेल्या विविध प्रश्नांची वाचकाला जाणीव करून देणे, हा प्रस्तुत लेखाचा दुसरा मुख्य उद्देश आहे. द्यूतातल्या आणि अनुद्यूतातल्या युधिष्ठिराच्या सहभागासंबंधी संहितेत असलेल्या सर्व गोष्टी आम्ही लेखात अशा प्रकारे मांडण्याचा प्रयत्न केला आहे की, त्या वाचून झाल्यावर– इच्छा असल्यास – वाचकाला युधिष्ठिराच्या उत्तरदायित्वाविषयी संहितेशी सुसंगत असे स्वतःचे मत बांधता यावे. लेखाचा दुय्यम उद्देश आहे : द्यूतासंबंधीच्या विविध गोष्टी रचताना व्यासांनी त्यात ओतलेले नाट्य आणि गुंफलेला मनुष्यस्वभाव वाचकासमोर मांडणे.[३]

आता काही स्फुट गोष्टी.

महाभारतातली कथापात्रे जणू तुमच्या आमच्यासारखी खरी माणसे होती अशा थाटात प्रस्तुत लेख लिहिला असला, तरी तो थाट केवळ लेखनाच्या सोयीसाठी आहे. आम्ही महाभारताकडे केवळ एक प्राचीन वाङ्मय म्हणून पाहत आहोत – इतिहास, सांस्कृतिक वारसा, धर्मग्रंथ,

भगवद्गीतेला कोंदण असल्या कोठल्या दृष्टीने नाही – हे वाचकाने अवश्य लक्षात घ्यावे.

परंपरेस अनुसरून, महाभारताची रचना व्यासांनी केली असे लेखामध्ये आम्ही जरी मानले असले, तरी ते केवळ लेखनाच्या सोईसाठी आहे. महाभारत कोणा एका व्यक्तीने रचलेले नसून ते अनेक रचनाकारांकडून अनेक शतकांच्या अवधीत रचले गेले आहे, ह्याविषयी तज्ज्ञांमध्ये आता दुमत राहिलेले दिसत नाही.

महाभारतातली म्हणून लेखात उद्धृत केलेली सर्व अवतरणे Sukthankar et al. (1933-66) ह्या ग्रंथातून घेतली आहेत. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर ह्या पुण्याच्या संस्थेने संपादित केलेला तो ग्रंथ महाभारताची संशोधित आवृत्ती (Critical Edition) असून प्रस्तुत लेखाला पार्श्वभूमी म्हणून त्या आवृत्तीतली कौरव-पांडवांची कथा घेतली आहे.

शकुनी आणि युधिष्ठिर ह्यांच्यामधल्या द्यूताविषयी एक स्पष्टीकरण. त्या दोघांमधले द्यूत पट, सोंगट्या, आणि फासे किंवा कवड्या वापरून खेळले गेले होते असा आपला – चुकीचा – समज असतो. तथापि, ते द्यूत गणनाकौशल्यावर बसवलेले होते.

अधिक माहितीसाठी लेखास जोडलेले पहिले परिशिष्ट पाहा.

*  *  *

कौरवपांडवांमधल्या द्यूतात पांडवांच्या बाजूने युधिष्ठिर खेळला होता, आणि कौरवांच्या बाजूने शकुनी खेळला होता. त्या प्रसंगी कौरवांनी केलेल्या राज्यहरणा-वरून व द्रौपदीच्या विटंबनेवरून पांडवपक्षातल्या कथा-पात्रांनी कौरवांना कथेत पुनःपुनः दोष लावला आहे. युधिष्ठिराला द्यूत धड खेळता येत नव्हते आणि द्यूतात शकुनीचा हात धरणारा साऱ्या जगात कोणी नव्हता, असे संहिता सांगते. शकुनी त्याच्या कौशल्याच्या बळावर जिंकला की द्यूत खेळताना लबाड्या केल्याने जिंकला, ह्याविषयी दुमत होणे शक्य आहे. (लेखास जोडलेल्या दुसऱ्या परिशिष्टातले मेहेंदळ्यांचे मत पाहा). तथापि, पांडवांविषयी कौरवांच्या मनात असूया होती; राजसूय यज्ञात पांडवांना मिळालेली अफाट संपत्ती पाहून दुर्योधनाला मत्सराने घेरले; आणि पांडवांना युद्धात हरवून त्यांची ती संपत्ती हस्तगत करणे शक्य नसले तरी युधिष्ठिराला शकुनी द्यूतात सहज हरवू शकणारा होता, हे लक्षात घेऊन कौरवांनी द्यूताचा कट रचून त्यात युधिष्ठिराला ओढले, हे सारे संहितेत आहे. कौरवांनी त्या प्रसंगी केलेली द्रौपदीची विटंबना हा तर मोठा अधमपणा आहे. कौरवपक्षाचे द्यूताच्या प्रसंगीचे वर्तन सर्वथा गर्हणीय आहे, हे निर्विवाद. कथेत पुढे घडलेल्या युद्धात पांडवांनी ह्या साऱ्याचा सूड उगवला, हे मनुष्यस्वभावाला धरूनच आहे. तथापि, द्यूतात पांडवांचे राज्य गेले आणि त्या प्रसंगी द्रौपदीची विटंबना झाली, ह्याचे उत्तरदायित्व सर्वस्वी कौरवांकडे होते – त्या प्रसंगी जे घडले त्या संबंधात युधिष्ठिर सर्वस्वी निर्दोषी होता – असे म्हणता येते का? कौरवपांडवांमधल्या द्यूताचा प्रसंग आणि पांडव-पक्षातल्या विविध कथापात्रांच्या त्या प्रसंगाविषयीच्या प्रतिक्रिया, हे सारे जर पूर्वग्रह बुद्ध्या बाजूला सारून मूळ ग्रंथातून लक्षपूर्वक वाचले तर असे जाणवते की, द्यूतात जे काही घडले, त्याला कथेत एक वेगळा पदर आहे.[४]

आपल्यासमोर सामान्यतः न मांडल्या जाणाऱ्या ह्या वेगळ्या पदराचे स्वरूप लक्षात येण्यासाठी द्यूत व अनुद्यूत (दुसऱ्यांदा घडलेले द्यूत) ह्यांसंबंधी काही साधे प्रश्न उपस्थित करणे योग्य ठरेल.

युधिष्ठिर स्वतः होऊन कौरवांशी द्यूत खेळायला गेला नव्हता : धृतराष्ट्राने त्याला 'सुहृद्द्यूत' – मैत्रीने खेळायचे द्यूत – खेळायला ये, असे आमंत्रण पाठवल्यावर तो गेला होता. तथापि, दुर्योधन कारस्थानी आहे आणि धृतराष्ट्र त्याच्या मुठीत आहे, हे युधिष्ठिराला माहीत नव्हते असे नाही : लाक्षागृहात पांडवांना जाळायचा प्रयत्न कथेत तोवर होऊन गेला होता. तसेच, धृतराष्ट्राच्या आमंत्रणातल्या 'सुहृद्द्यूत' ह्या शब्दाने फसण्याएवढा युधिष्ठिर भोळा नव्हता. धृतराष्ट्राने विदुराबरोबर पाठवलेल्या त्या आमंत्रणात काहीतरी गोम आहे, हे युधिष्ठिराच्या लगेच लक्षात आले होते. विदुराने त्याला त्याविषयी सावधही केले होते; एवढेच नव्हे, तर युधिष्ठिराने द्यूताला जाऊ नये असे त्याने ध्वनितही केले होते. प्रश्न असा पडतो की, धृतराष्ट्राच्या आमंत्रणात गोम आहे हे लक्षात येऊनही, आणि आपण द्यूताला जाऊ नये असे महामती

विदुराचे मत आहे हे समजूनही युधिष्ठिर द्यूत खेळायला का गेला?

बरे, गेला तर गेला; निदान पुढचेमागचे भान ठेवून तरी खेळायचे! युधिष्ठिराला द्रौपदीने त्या प्रसंगी पुढे लावलेले विशेषण आहे : द्यूतमदेन मत्तः – द्यूतमदाने बेफाम झालेला.[५] द्यूतातल्या पहिल्या दहाच डावांमध्ये त्याने अफाट संपत्ती गमावली आहे. शकुनी डावापाठोपाठ डाव जिंकतो आहे आणि युधिष्ठिर बेफामपणे एकाहून एक आत्मविघातक पण लावतो आहे हे पाहून की काय, दहाव्या डावानंतर विदुराने, "आता हे द्यूत येथे थांबवा", असे धृतराष्ट्राला कळकळीने विनवले होते. त्या वेळी विदुर जरी धृतराष्ट्राला उद्देशून बोलत होता, तरी त्याच्या शब्दांमध्ये आपल्यालाही अप्रत्यक्ष सूचना असल्याचे युधिष्ठिरला उमगले नाही, असे म्हणवत नाही. निदान, तेव्हातरी युधिष्ठिराने जागे व्हायचे! तो जर तेव्हा थांबला असता, किंवा तेव्हापासून थोडे तारतम्य ठेवून पण लावायला लागला असता, तर त्याच्याकडे त्या वेळी राज्यही शिल्लक होते आणि निखर्वांने संपत्तीही शिल्लक होती. पण युधिष्ठिर थांबत नाही; धृतराष्ट्र विदुराच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करतो; दुर्योधन विदुराला, 'तुला आमचे भले बघवत नाही', असे तोंड करतो; आणि द्यूत पुन्हा सुरू होते. त्यानंतरच्या चारच डावांमध्ये युधिष्ठिराने त्याची उरलेली सारी संपत्तीच नाही, तर राज्यदेखील पणाला लावून घालवले आहे. हे सारे गमावल्यावर त्याने एक एक करून त्याच्या भावांना व त्यानंतर स्वतःला पणाला लावले आहे; आणि तेही सारे पण तो हरला आहे. जेव्हा हे सारे गेले आणि पणाला लावायला जवळ दुसरे काही धन उरले नाही, तेव्हा द्यूतातल्या विसाव्या व (व शेवटल्या) डावात त्याने द्रौपदीला – स्वतःच्या धर्मपत्नीला–पणाला लावले आहे. हे सारे करायची त्याच्यावर कोणी बळजबरी केली नव्हती. प्रश्न असा पडतो की, युधिष्ठिराने स्वतः केलेल्या त्या कृत्यांना, आणि त्या कृत्यांचे पुढे जे काही दुष्परिणाम झाले त्यांना, आपण त्याला स्वतःला – निदान काही प्रमाणात तरी – जबाबदार धरायचे की कौरवांना शंभर टक्के जबाबदार धरायचे?

द्यूतात युधिष्ठिराने बेफामपणे लावलेल्या पणांवरून त्याला जबाबदार न धरण्याची प्रथा दिसते. त्या संबंधात त्याच्या बाजूने दिले जाणारे एक समर्थन असेः (कोठल्या तरी कारणाने) त्याचा निरुपाय झाला म्हणून त्याने ते पण लावले. तथापि, युधिष्ठिराने द्यूतात लावलेल्या पणांचे संहितेतले वर्णन वाचता युधिष्ठिराने निरुपाय म्हणून ते पण लावले, हे समर्थन ग्राह्य मानणे कठीण जाते. स्पष्टी-करण म्हणून, त्याने लावलेल्या पणांविषयी थोडी माहिती देणे योग्य ठरेल.

द्यूतात पणाला काय व किती लावायचे, ते पहिल्या चौदा डावांच्या वेळी युधिष्ठिराला कोणी सांगायला किंवा सुचवायला गेले नव्हते. ते सारे त्याने स्वतःच ठरवले होते. त्याने त्या डावांमध्ये कशा प्रकारचे पण लावले आहेत त्याचे एक उदाहरण म्हणून द्यूतातल्या अकराव्या डावाकडे पाहू या. दहाव्या डावानंतर द्यूत पुन्हा सुरू होताना शकुनी युधिष्ठिराला टोकून म्हणाला होता की, पांडवांचे खूप धन तू आता हरला आहेस; तुझ्याकडे आणखी काही धन शिल्लक असेल तर सांग. युधिष्ठिर नुकताच सम्राट झाला होता, आणि राजसूय यज्ञात करभार म्हणून त्याला – दुर्योधनासारख्या धनाढ्य राजाचेही डोळे फाटतील इतके – अफाट धन मिळाले होते. परिणामतः, त्याला 'ग'ची बाधा झाली होती, असे दिसते. शकुनीने विचारलेला प्रश्न मोठा अपमानाचा वाटलेल्या युधिष्ठिराने त्याला दिलेले उत्तर आहे : माझ्याकडे निखर्वांने धन आहे! ह्यानंतर – आपण पणाला किती काय लावू शकतो ते ह्या मूर्खाला दाखवून द्यावे म्हणून की काय युधिष्ठिराने त्याच्याजवळचे सारेच्या सारे निखर्व त्या एका डावात पणाला लावले आहेत! निरुपाय झाला म्हणून (किंवा शकुनीने टोकले म्हणून) युधिष्ठिराने ते सारे निखर्व त्या एका पणात लावले, हे त्या पणाचे समर्थन कितपत रास्त आहे?

द्यूतातल्या पंधराव्या – नकुलाच्या – पणापासून शकुनी पणांना लावायच्या गोष्टींबद्दल युधिष्ठिराशी बोलायला लागला होता; आणि विसाव्या पणाच्या वेळी तो युधिष्ठिराला म्हणाला होता की,

पणस्व कृष्णां पाञ्चालीं तयात्मानं पुनर्जय।।

२.५८.३१

– पांचाली कृष्णेला (द्रौपदीला) तू पणाला लाव,






आणि (तिला लावून) स्वतःला पुन्हा जिंकून घे.[६-७]

त्या पणाच्या वेळी युधिष्ठिर दास झाला होता, हे खरे आहे. तथापि, केवळ शकुनीचा शब्द मोडता येत नाही म्हणून युधिष्ठिराने द्रौपदीला पणाला लावले असे मानणे कथेशी सुसंगत नाही.[८] एक तर, शकुनीचे म्हणणे ही सूचना होती; आज्ञा नव्हती. दुसरे म्हणजे, युधिष्ठिर काही शकुनीचा दास झाला नव्हता. तो दास झाला होता दुर्योधनाचा; आणि लेखात पुढे येतेच आहे की, त्या प्रसंगी कुरुसंसदेत झालेल्या वादविवादात खुद्द दुर्योधनाने विचारलेल्या प्रश्नाला – दुर्योधनाने डिवचूनही – युधिष्ठिराने उत्तर दिलेले नाही.[९] तेव्हा, युधिष्ठिर कौरवांचा दास झाला असल्याने तो कौरवपक्षातला कोणीही जे काही सुचवेल ते सारे करत होता, हे खरे नाही. द्रौपदीला पणाला न लावण्याची युधिष्ठिराला मुभा होती, हे कुरु-संसदेत झालेल्या वादविवादातही अध्याहृत आहे.

तर मग, शकुनीने लाख सुचवले, लागोपाठ एकोणीस डाव हरल्यावर त्याने द्रौपदीला पणाला लावायला हवेच होते का? त्यातून, दासी ही महाभारतकाळी उघड उघड भोगदासी असे.[१०] आपल्या सर्वांना ते माहीत असो वा नसो, युधिष्ठिराला ते माहीत होते. प्रश्न असा पडतो की, द्रौपदी कौरवांची दासी झाली ह्याला आपण कोणाला जबाबदार धरायचे : युधिष्ठिराला की कौरवांना?

युधिष्ठिराच्या सहभागाविषयीचे प्रश्न येथे संपत नाहीत. क्षणभर असे धरून चला की, द्यूताच्या आमंत्रणा-तल्या सुहृद्द्यूत ह्या शब्दाने युधिष्ठिराची फसगत झाली; आणि क्षणभर असेही धरून चला की, द्यूतातल्या वीस डावांमध्ये तो जे हरला व त्यानंतर कौरवांनी द्रौपदीची जी विटंबना केली त्याचे उत्तरदायित्व सर्वस्वी कौरवांकडे होते. तथापि, द्यूतात घडलेल्या गोष्टींनंतर हे उघड होते की, पांडवांचा सत्यानाश करायला निघालेल्या कौरव-पक्षाकडून आलेले अनुद्यूताचे आमंत्रण सुहृद्द्यूतासाठी नव्हते. तर मग, आमंत्रण आले म्हणून युधिष्ठिराने अनुद्यूतासाठी परत जायला हवेच होते का? बरे गेला तर गेला, बारा वर्षे वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास ह्या शकुनीने सुचवलेल्या पणाला त्याने होकार द्यायला हवाच होता का?

द्यूतातल्या व अनुद्यूतातल्या युधिष्ठिराच्या सहभागा-विषयी वर उभे केलेले प्रश्न नवीन नाहीत. त्या प्रश्नांच्या संदर्भात एक गोष्ट नमूद करणे इष्ट ठरेल : युधिष्ठिर द्यूताचे व अनुद्यूताचे आमंत्रण नाकारत का नाही आणि अनुद्यूतात शकुनीने सुचवलेल्या पणाला तो होकार का देतो, त्याची कारणे त्याच्या तोंडी कथेत आहेत. त्या कारणांचे तपशील लेखात पुढे येत आहेत. तूर्त त्यांविषयी एवढे म्हणून पुरणार आहे की, ती कारणे खरी होती, की ते सारे वरवरचे बोलणे होते आणि युधिष्ठिर द्यूत खेळायला गेला कारण त्याला मनातून जायचेच होते, हा प्रश्नच आहे.

युधिष्ठिर आणि द्यूत ह्या संबंधात वर उपस्थित केलेले सर्वच प्रश्न महत्त्वाचे असले, तरी त्यांतला एक प्रश्न विशेष महत्त्वाचा आहे. द्यूतात घडलेल्या गोष्टींवरून पांडवपक्षाने कौरवांना वेळोवेळी जो दोष दिला आहे, तो मुख्यतः द्यूतानंतर घडलेली द्रौपदीची विटंबना आणि अनुद्यूतात झालेले राज्यहरण ह्या दोन गोष्टींवरून आहे. पण, जर द्यूत संपले नसते तर द्रौपदीची विटंबना टळली असती आणि अनुद्यूत खेळायची वेळही आली नसती; आणि युधिष्ठिर द्यूतात जर बेफामपणे खेळला नसता तर द्यूत संपले नसते; निदान – द्रौपदीने कथेत पुढे म्हटले आहे तसे – कित्येक वर्षे संपले नसते. म्हणूनच, 'युधिष्ठिर कौरवांशी द्यूत व अनुद्यूत खेळायला का गेला?' ह्या प्रश्नाहून अधिक महत्त्वाचा प्रश्न असा : युधिष्ठिर द्यूतात बेफामपणे का खेळला? द्यूतातील युधिष्ठिराच्या सहभागाविषयी कोणाचेही म्हणणे वाचताना – मग ते म्हणणे महाभारतातल्या एखाद्या कथापात्राचे असो वा महाभारतावरच्या एखाद्या लेखकाचे असो – ही गोष्ट आपण लक्षात ठेवण्यासारखी आहे.

* * *

आता, द्यूतातल्या आणि अनुद्यूतातल्या युधिष्ठिराच्या सहभागासंबंधी संहितेत असलेल्या गोष्टींच्या तपशिलांकडे वळू या.

'युधिष्ठिर द्यूत, तसेच अनुद्यूत खेळायला का गेला?' हे प्रश्न वर उभे करून झाले आहेत. त्या प्रश्नांच्या संदर्भात सभापर्वाच्या संहितेत असलेल्या काही गोष्टींपासून प्रारंभ करणे सोईचे आहे.

त्या संदर्भातली संहितेतली पहिली गोष्ट आहे :

द्यूतापूर्वी शकुनीने केलेली युधिष्ठिराची पारख. कौरवांच्या गोटात द्यूताचा कट रचला जात असतानाची गोष्ट आहे. राजसूयाच्या वेळी दिसलेल्या पांडवांच्या ऐश्वर्यामुळे मत्सराने जळफळाट होत असलेल्या दुर्योधनाला द्यूताची कल्पना सुचवताना शकुनी म्हणाला होता :

द्यूतप्रियश्च कौन्तेयो न च जानाति देवितुम्।
समाहूतश्च राजेन्द्रो न शक्ष्यति निर्वर्तितुम्।।
२.४४.१८

– कौन्तेय द्यूतप्रिय आहे; पण ते खेळण्याचे त्याला (पुरेसे) ज्ञान नाही. त्या राजेंद्राला (द्यूताचे) आमंत्रण/(आह्वान) दिले तर त्याला नाही म्हणवणार नाही/(माघार घेणे शक्य होणार नाही).[११]

शकुनीने केलेली पारख किती अचूक होती, त्याचा प्रत्यय कथेत पुढे येतो.

आता, द्यूत खेळायला जाण्याविषयी सभापर्वात युधिष्ठिराच्या स्वतःच्या तोंडी असलेल्या काही गोष्टी पाहू या. त्या संदर्भात, धृतराष्ट्राकडून सुहृद्द्यूताचे आमंत्रण घेऊन आलेल्या विदुराशी झालेले युधिष्ठिराचे संभाषण उद्बोधक आहे.

विदुराने आणलेल्या निरोपात आह्वान किंवा तत्सम दुसरा कोठला शब्द नव्हता. ते साधे आमंत्रण होते. पण, लेखात आधी लिहिल्याप्रमणे, त्या आमंत्रणात काही-तरी गोम आहे, हे युधिष्ठिराच्या लगेच लक्षात आले होते. द्यूताला जावे की न जावे ह्याविषयी त्याने विदुराला सल्ला विचारल्यावर, आणि 'भवद्वाक्ये सर्व एव स्थिताः स्म' – आम्ही सर्वजण तुमच्या शब्दाबाहेर नाही – असे म्हटल्यावर विदुराने त्याला दिलेले उत्तर असे : "द्यूत हे अनर्थाचे मूळ आहे; आणि मी द्यूत टाळण्याचा प्रयत्न करूनही राजाने मला तुझ्याकडे पाठवले आहे." विदुराच्या उत्तराचा शेवट आहे :

श्रुत्वा विद्वञ्श्रेय इहाचरस्व। २.५२.११

– विद्वान् माणसा, (हे सारे तू) ऐकलेस. (आता) तुला योग्य वाटेल ते तू कर.

विदुराने युधिष्ठिराला, 'तू द्यूताला जाऊ नकोस!' असे स्पष्ट शब्दांमध्ये सांगणे, हा राजद्रोह झाला असता. पण, विदुराला ते शब्द वापरण्याच्या जेवढे जवळ जाणे शक्य होते, तेवढा तो गेला आहे. विदुराच्या शब्दांवरून हे उघड आहे की, केवळ धृतराष्ट्राने द्यूताचे आमंत्रण पाठवले म्हणून युधिष्ठिराने द्यूत खेळायला जायलाच हवे, असे विदुराला वाटलेले नाही.

विदुराचे महाभारतात पुनःपुनः येणारे वर्णन आहे, महामती. विदुराने त्याला दिलेल्या उत्तराचा मथितार्थ युधिष्ठिराला समजला नाही, असे म्हणवत नाही. तथापि, त्याचे हे उत्तर ऐकल्यावर युधिष्ठिराने त्याला, 'बरे, मी जात नाही', असे म्हटलेले नाही. युधिष्ठिराने त्याला विचारले आहे, 'द्यूत खेळायला धार्तराष्ट्र सोडून तेथे कोण कोण आहेत?' उत्तर म्हणून विदुराने जी चार-पाच नावे सांगितली आहेत, त्यांतले पहिलेच नाव आहे -शकुनी. तसेच, शकुनीची ख्याती युधिष्ठिर विसरला असेल तर त्याला आठवण करून द्यायला म्हणून की काय, विदुराने शकुनीच्या नावाला तीन विशेषणे जोडली आहेत : अतिदेविन् – फार मोठे पण लावून खेळणारा; कृतहस्त – कुशल; मताक्ष – अक्ष टाकण्यात सराईत.

विदुराने सांगितलेली नावे ऐकल्यावर युधिष्ठिराची प्रतिक्रिया आहे :

महाभयाः कितवाः संनिविष्टा
मायोपधा देवितारोऽत्र सन्ति।

– हे सारे तर मायेने खेळणारे भयंकर जुगारी एकत्र जमले आहेत!

सारांश असा : धृतराष्ट्राच्या आमंत्रणात काहीतरी गोम आहे; द्यूतासाठी हास्तिनपुराला पटाईत जुगारी जमले आहेत; आपण द्यूत खेळायला जाऊ नये, असे विदुराचे मत आहे; हे सारे युधिष्ठिराला उमगले आहे.

आता, द्यूत खेळायला जायचे की नाही, ह्यावर युधिष्ठिराने निर्णय घ्यायची वेळ आली. विदुराशी त्यावर बोलताना युधिष्ठिराने, द्यूताचे आमंत्रण मला का नाकारता येत नाही, त्याची तीन कारणे दिली आहेत.

युधिष्ठिराचे पहिले कारण आहे – दैव. तो म्हणतो,

धात्रा तु दिष्टस्य वशे किलेदं
नादेवनं कितवैरद्य तैर्मे।। २.५२.१४

– खरोखर, विधाता ठरवेल त्याप्रमाणे सारे जग चालत असते. आता, त्या जुगाऱ्यांशी खेळणे मला टाळता येणे शक्य नाही.

द्यूताचे आमंत्रण न नाकारण्याचे युधिष्ठिराचे दुसरे

कारण आहे – पित्याची आज्ञा. तो विदुराला म्हणतो,

नाहं राज्ञो धृतराष्ट्रस्य शासनान्
न गन्तुमिच्छामि कवे दुरोदरम्।
इष्टो हि पुत्रस्य पिता सदैव
तदस्मि कर्ता विदुरात्थ मां यथा।। २.५२.१५

– प्रज्ञावंता, मला धृतराष्ट्राने आज्ञा केल्यावर द्यूता-साठी मी जाऊ इच्छिणार नाही, असे घडणे नाही.[१२] पिता पुत्राला नेहमीच पूज्य असतो. तेव्हा, विदुरा, तू मला (निरोपात) सांगितलेस तसे मी करीन.

धृतराष्ट्राने पाठवलेल्या आमंत्रणाला 'शासन' – आज्ञा – म्हणणे कितपत योग्य आहे, हा प्रश्नच आहे. निदान विदुराला ते आमंत्रण 'शासन' वाटले नाही, हे लेखात आधी येऊन गेलेल्या त्याच्या बोलण्यावरून दिसते.

युधिष्ठिराने विदुराला दिलेले तिसरे कारण आहे - आह्वान. तो सांगतो,

न चाकामः शकुनिना देविताहं
न चेन्मां धृष्णुराह्वयिता सभायाम्।
आहूतोऽहं न निवर्ते कदाचित्
तदाहितं शाश्वतं वै व्रतं मे।। २.५२.१६

– मी शकुनीशी (द्यूत) खेळायला तयार नाही असे नाही. नाही तर तोच मला सभेत उद्धटपणे (द्यूत खेळण्याचे) आह्वान देईल; आणि, कोणी आह्वान दिल्यास माघार घ्यायची नाही, असे माझे शाश्वत व्रत आहे.[१३]

युधिष्ठिराच्या तोंडी येथे आलेला दैव हा शब्द द्यूताच्या संदर्भात त्याच्या तोंडी पुढेही आला आहे. त्याविषयी थोडे स्पष्टीकरण देणे योग्य ठरेल.

दैवाला मानवी आयुष्यात महत्त्वाचे स्थान आहे, ह्याविषयी महाभारताच्या कथाविश्वात कुणाचेच दुमत नसते. तथापि, दैव ह्या अर्थाने युधिष्ठिराच्या तोंडी येथे व कथेत इतरत्र असलेल्या 'दिष्ट', 'भवितव्य' वगैरे शब्दांच्या संदर्भात, तसेच विधाता ह्या अर्थाने त्याच्या तोंडी येथे व कथेत इतरत्र आलेल्या 'धातृ', 'विधि' वगैरे शब्दांच्या संदर्भात काही गोष्टी लक्षात घेणे आवश्यक आहे. 'मला दैत्यांचा फार भार झाला आहे', असे गाऱ्हाणे घेऊन पृथ्वी ब्रह्मदेवाकडे गेली; आणि मग, दैत्यांचा संहार करून तिचा भार हलका करण्यासाठी देवांनी पृथ्वीवर अवतार घेतले; हे सारे कथेत वैशंपायनांच्या तोंडी असल्याने आपल्याला माहीत असते. त्या साऱ्याला आपण कथेचा दैवी स्तर म्हणू या. द्यूतात घडलेल्या घटना जरी दैवी स्तरावर ठरलेल्या गोष्टींना पूरक असल्या तरी त्या स्तरावरच्या गोष्टी घडून येण्यासाठी मनुष्यपातळी-वर युधिष्ठिर द्यूतात हरायलाच हवा होता किंबहुना, द्यूत घडायला हवेच होते – असे संहितेत कोठे आलेले नाही. द्यूत घडले नसते तरी दैवी स्तरावर ठरलेल्या गोष्टी दुसऱ्या कोठल्या तरी मार्गाने घडल्या असत्या, हे दैवाच्या कल्पनेत अध्याहृत आहे. दुसरे म्हणजे, कथेच्या वास्तवात दैवी स्तरावरच्या गोष्टी केवळ त्रिकालज्ञ कथा-पात्रांनाच माहीत असतात. महाभारतात व्यास आणि नारद ह्यांच्यासारखी त्रिकालज्ञ कथापात्रे असली, तरी युधिष्ठिर हे कथापात्र त्यातले नाही. भविष्यात काय घडणार आहे ते तुमच्या आमच्यासारखेच युधिष्ठिरालाही स्वतःच्या प्रज्ञेने कळत नसते. युधिष्ठिराला दैवी स्तरावरच्या गोष्टी कळण्याचा कथेतला एकमेव मार्ग म्हणजे, कोठल्या तरी त्रिकालज्ञ पात्राने त्याला त्या सांगायच्या. द्यूतापूर्वी घडलेल्या राजसूय यज्ञाच्या वेळी युधिष्ठिराला व्यास व नारद ह्या दोघांकडूनही दैवी स्तरावरच्या गोष्टी – काही प्रमाणात तरी – समजल्या होत्या, हे संहितेत आहे.[१४] त्यांतली येथे प्रस्तुत असलेली गोष्ट अशी : कौरव व पांडव आपापसात लढून नष्ट होतील, हे त्याला नारदाकडून त्या वेळी कळले होते. तथापि, तो द्यूतात हरणार आहे – किंबहुना, द्यूत घडणार आहे – असले काही त्याला व्यासांनी किंवा नारदाने सांगितल्याचे संहितेत नाही. युधिष्ठिर जेव्हा द्यूताच्या संदर्भात 'दिष्ट' किंवा तसलाच एखादा शब्द वापरतो, तेव्हा त्यामागे दोन भाव पाहता येतात. पहिला असा : विधात्याने जे ठरवले असेल ते, काही झाले तरी घडतच असते; ते बदलण्याचे सारे मानवी प्रयत्न फोल असतात. हे भविष्याविषयीचे ज्ञान नाही; ही जगाकडे पाहण्याची दृष्टी आहे. त्याच्या त्या शब्दांमागे पाहता येणारा दुसरा भाव असा : द्यूतासंबंधी जे घडते आहे ते सारे दैवाने ठरवलेले असून त्यातून माझी सुटका नाही. हे भविष्याविषयीचे ज्ञान नाही; ही भविष्याविषयी करून घेतलेली समजूत आहे.

युधिष्ठिराने विदुराला दिलेल्या कारणांमागचा त्याचा भाव काहीसा असा : मला बापाची आज्ञा डावलता येत




नाही आणि कोणी आह्वान दिल्यास मागे हटता येत नाही, ह्यांचा उपयोग करून दैवाने मला खिंडीत गाठले.

द्यूतासाठी इंद्रप्रस्थाहून हास्तिनपुराला जायला निघतानाचे युधिष्ठिराचे शेवटले शब्द आहेत :

दैवं प्रज्ञां तु मुष्णाति तेजश्चक्षुरिवापतत्।
धातुश्च वशमन्वेति पाशैरिव नरः सितः।। २.५२.१८

– वीज चमकली की डोळे जसे दिपतात, तसे दैव प्रज्ञेला कुंठित करते; आणि मग, माणूस पाशात जखडल्या-सारखा होऊन दैवाच्या अधीन होतो.

वैशंपायन केवळ एवढे सांगून थांबलेले नाहीत. युधिष्ठिर द्यूत खेळायला का चालला आहे, ह्याविषयी त्यांचे स्वतःचे मतही त्यांच्या तोंडी आहे. घडत असलेल्या प्रसंगाविषयी वैशंपायनांच्या तोंडी असलेले अशा प्रकारचे शब्द रचनाकाराचा हेतू दर्शवणारे असल्याने त्यांना महत्त्व द्यायचे असते.

वैशंपायन जनमेजयाला सांगतात :

इत्युक्त्वा प्रययौ राजा सह क्षत्त्रा युधिष्ठिरः।
अमृष्यमाणस्तत्पार्थः समाह्वानमरिंदमः।। २.५२.१९

– असे म्हणून, ते आह्वान न सहन झालेला अरिंदम पार्थ युधिष्ठिर राजा मग विदुरासह निघाला.

अरिंदम – शत्रूंना जर्जर करणारा – हे क्षत्रियांसाठी वापरले जाणारे बहुमानाचे विशेषण आहे. ते शब्दशः घ्यायचे नसते.

सारांशः द्यूताला जाण्याची युधिष्ठिराने विदुराला आणि पर्यायाने स्वतःला – दिलेली कारणे आहेत : दैव, पित्याची आज्ञा, आणि व्रत.[१५] मुख्य म्हणजे, दैव. तथापि, तो का जातो आहे त्याचे वैशंपायनांना दिसलेले कारण वेगळे आहे : युधिष्ठिराला ते आह्वान सहन झाले नाही.

दैव, पित्याची आज्ञा, आणि व्रत ह्या कारणांनी असो वा आह्वान सहन न झाल्याने असो, द्यूत धड न खेळता येणारा हा माणूस, द्यूतात पारंगत म्हणून जगप्रसिद्ध असलेल्या माणसाशी दोन हात करायच्या तयारीने निघालेला आपल्याला दिसतो; कौरवपक्षाने त्याची नाडी जोखून रचलेला डाव आपल्याला दिसतो; आणि मग, पांडवांपुढे वाढून ठेवलेल्या शोकांतिकेचे फक्त तपशील समजायचे उरतात.

*　　*　　*

द्यूत ह्या महाभारतातल्या मध्यवर्ती प्रसंगाला व्यासांनी रचलेल्या ह्या प्रारंभातले नाट्य थक्क करणारे आहे.

पांडव द्यूतासाठी हास्तिनपुराला जाऊन पोचले. शकुनी आणि युधिष्ठिर ह्यांच्यामधले द्यूत त्यानंतर दुसऱ्या दिवशी घडले आहे. धृतराष्ट्राने द्यूतासाठी खास बांधून घेतलेल्या सभागृहात पांडव शिरल्याशिरल्या शकुनी युधिष्ठिराला म्हणाला आहे की, सारेजण द्यूत खेळायला उत्सुक झाले आहेत; तर आता खेळाला सुरुवात होऊ दे. त्यावर युधिष्ठिराने 'निकृती' – चलाखी, कपट, लबाडी – वापरून द्यूत खेळणे मोठे पाप असते ह्या आशयाचे व्याख्यान दिल्यावर शकुनीने त्याला म्हटले आहे की,

श्रोत्रियोऽश्रोत्रियमुत निकृत्यैव युधिष्ठिर।
विद्वानविदुषोऽभ्येति नाहुस्तां निकृतिं जनाः।।
एवं त्वं मामिहाभ्येत्य निकृतिं यदि मन्यसे।
देवनाद्विनिवर्तस्व यदि ते विद्यते भयम्।।
२.५३.११-१२

– युधिष्ठिरा, कोठलाही श्रोत्रिय (वेदांत पारंगत ब्राह्मण) अश्रोत्रिय माणसाला (वादविवादात) निकृतीनेच (सामोरा जातो), आणि कोठलाही विद्वान माणूस अविद्वानाला (वादात) निकृतीनेच सामोरा जातो (असे म्हणता येईल). पण लोक त्याला काही निकृती म्हणत नाहीत.[१६] तथापि, द्यूत खेळायला तू माझ्याकडे आला आहेस. मी निकृती करतो असे जर तू मानत असशील, जर (त्याचे) तुला भय वाटत असेल तर तू (माझ्याशी) खेळू नकोस.

शकुनीने युधिष्ठिराला किती नीट जोखला आहे! आपण ह्या माणसाला 'यदि ते विद्यते भयम्' – जर तुला भय वाटत असेल तर – म्हटले की, तो आपल्याशी खेळायला आल्यावाचून राहणार नाही, हे शकुनीचे अनुमान खोटे ठरत नाही. युधिष्ठिर त्याला म्हणतो,

आहूतो न निवर्तेयमिति मे व्रतमाहितम्।
विधिश्च बलवान्राजन्दिष्टस्यास्मि वशे स्थितः।।
२.५३.१३

– कोणी आह्वान दिल्यास माघार घ्यायची नाही,








हे तर माझे ठरलेले व्रत आहे. राजा, दैव बलवान आहे; मी दैवाच्या अधीन आहे.

'दिष्टस्यास्मि वशे स्थितः' – मी दैवाच्या अधीन आहे – ह्या युधिष्ठिराच्या उद्गारांमागे, दैवाने मला खिंडीत गाठले हा भाव आहे.

त्यानंतर युधिष्ठिराने जेव्हा, 'माझ्याशी कोण खेळणार आहे?' असे विचारले तेव्हा दुर्योधन त्याला म्हणतो की, द्यूतात पणाला लावायचे धन मी देणार आहे आणि माझ्या वतीने द्यूत शकुनी खेळणार आहे. त्यावर युधिष्ठिराचे उत्तर आहे,

अन्येनान्यस्य विषमं देवनं प्रतिभाति मे।

– एकासाठी दुसऱ्याने खेळणे 'विषम' आहे, असे मला वाटते.

'विषम' ह्या शब्दाचा येथील अर्थ आहे : फसवा-फसवीचे, अयोग्य, नियमबाह्य.

मी असल्या 'विषम' गोष्टींमध्ये भाग घेत नसतो, असे युधिष्ठिराला म्हणता आले असते. पण त्याऐवजी त्याने दुर्योधनाला म्हटले आहे,

एतद्विद्वन्नुपादत्स्व काममेवं प्रवर्तताम्।। २.५३.१६

– विद्वान् माणसा, तू हे लक्षात घे; आणि (तरीही तुला जर हवे असेल तर मग तशा द्यूताला) खुशाल सुरुवात होऊ दे.

युधिष्ठिराने त्या 'विषम' द्यूताला नकार न देण्यामागचे त्याचे कारण संहितेत दिलेले नाही. तथापि, द्यूताचा प्रस्ताव मांडताना शकुनीच्या तोंडी येऊन गेलेली युधिष्ठिराची द्यूतप्रियता, किंवा आपण शकुनीशी खेळायला घाबरलो असे दिसू नये, हे ते कारण असावे.

ह्यानंतर द्यूताला सुरुवात होते आणि, लेखात आधी येऊन गेल्याप्रमाणे, विसाव्या डावात युधिष्ठिर द्रौपदीला पणाला लावून तो पणही हरतो.

अनुद्यूताकडे वळू या. युधिष्ठिराने द्यूतात जे काही गमावले होते ते सारेच्या सारे धृतराष्ट्राने द्यूताच्या शेवटी पांडवांना परत करून त्यांना इंद्रप्रस्थाला परत जाण्याची अनुज्ञा दिली होती. त्यानंतर दुर्योधन धृतराष्ट्राला, 'संतापलेल्या पांडवांपुढे आता आपली धडगत नाही,' हे पटवून देऊन अनुद्यूताचा प्रस्ताव मांडतो. धृतराष्ट्राला दुर्योधनाचे म्हणणे – नेहमीप्रमाणे – पटते आणि तो एका नोकराबरोबर पांडवांना अनुद्यूताचे आमंत्रण पाठवतो. पांडवांना ते आमंत्रण, ते परतीच्या वाटेवर असताना मिळाले आहे. धृतराष्ट्राच्या पहिल्या आमंत्रणामागचे कौरवांचे उद्दिष्ट युधिष्ठिराला उमगले नव्हते, असे एक वेळ म्हणता येते. ह्या दुसऱ्या आमंत्रणामागचे उद्दिष्ट तर आंधळ्यालाही दिसेल इतके स्पष्ट होते. तरीही, ते आमंत्रण मिळाल्यावर अर्ध्या वाटेतून परत फिरून युधिष्ठिर अनुद्यूत खेळायला गेला आहे. तसेच, आपण ह्या वेळीही शकुनीशी खेळणार आहोत, हे त्याने धरूनच घेतलेले दिसते.

अनुद्यूतासाठी परत फिरताना युधिष्ठिराने स्वतःशीच बोलण्याच्या थाटात काढलेले उद्गार आहेतः

धातुर्नियोगाद्भूतानि प्राप्नुवन्ति शुभाशुभम्।<br>
न निवृत्तिस्तयोरस्ति देवितव्यं पुनर्यदि।।<br>
अक्षद्यूते समाह्वानं नियोगात्स्थवरस्य च।<br>
जानन्नपि क्षयकरं नातिक्रमितुमुत्सहे।।

२.६७.३-४

– विधात्याने ठरवले असेल त्याप्रमाणेच सर्वांना शुभ किंवा अशुभ प्राप्त होत असते. जर पुन्हा द्यूत घडायचेच (प्रारब्धात) असेल, तर त्याच्या (शुभाशुभ) परिणामांपासून माझी सुटका नाही (हेच खरे). वृद्धाच्या (धृतराष्ट्राच्या) आज्ञेने आलेल्या द्यूताच्या आमंत्रणातून/आह्वानातून सत्यानाश घडणार आहे, हे समजूनही ते मला नाकारता येत नाही.

द्यूताच्या वेळी युधिष्ठिराच्या तोंडी असलेल्या कारणांशी हे सारे सुसंगत आहे.

युधिष्ठिर द्यूताला परत का गेला, ह्याविषयी वैशंपायनांनी जनमेजयाला दिलेले स्पष्टीकरण असे :

ह्रिया च धर्मसङ्गाच्च पार्थो द्यूतमियात्पुनः।।

२.६७.१५

– पार्थ (युधिष्ठिर) 'ह्री' – लज्जा – आणि 'धर्मसङ्ग' – धर्माची संगत – ह्या कारणांनी द्यूतास पुन्हा तयार झाला.

'धर्मसङ्ग' ह्यामागे, युधिष्ठिराच्या तोंडच्या वर दिलेल्या (२.६७.४) ह्या श्लोकातली वृद्धाची आज्ञा (किंवा लेखात दिलेल्या पुढच्याच श्लोकात त्याच्या तोंडी असलेला स्वधर्म) पाहता येत असल्याने त्या कारणात नवीन

काही नाही. पण 'ही' – लज्जा – हे कारण नवीन आहे. युधिष्ठिराला नेमकी कशाची लाज वाटली, ते वैशंपायनांच्या तोंडी नाही. एक शक्यता अशी : आह्वानास सामोरे न जाता आपण आता कच खाल्ली असे लोक म्हणतील, ह्या गोष्टीची ती लाज आहे.[१७] दुसरी शक्यता अशी : मागच्या वेळी दैव वगैरे कारणे देऊन द्यूताला 'हो' म्हटल्यावर आता आपण जर 'नाही' म्हटले, तर आपल्याला आधीच्या द्यूतालाही नाही म्हणता आले असते, असे ठरून लोक आपल्याला मूर्ख म्हणतील, ह्या गोष्टीची ती लाज आहे.

हास्तिनपुराला परतल्यावर पांडव पुन्हा द्यूत खेळायला बसतात आणि, 'बारा वर्षे वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास; आणि अज्ञातवासात ओळखले गेल्यास पुन्हा बारा वर्षे वनवास', असा पण शकुनी सुचवतो.

शकुनीने सुचवलेला पण ऐकल्यावर युधिष्ठिराचे उत्तर आहे :

कथं वै मद्विधो राजा स्वधर्ममनुपालयन्।
आहूतो विनिवर्तेत दीव्यामि शकुने त्वया।।
२.६७.१७

– कोणी आह्वान दिल्यावर माझ्यासारखा स्वधर्माचे पालन करणारा राजा माघार कसा घेईल? शकुने, मी तुझ्याशी (द्यूत) खेळतो.

स्वधर्म व द्यूताचे आह्वान ह्यांतला संबंध युधिष्ठिराच्या शब्दांवरून स्पष्ट होत नाही. युधिष्ठिराचे व्रत त्यामागे पाहता येते. क्षत्रियसमाजात युद्ध व द्यूत ह्या गोष्टी एकाच पातळीच्या मानल्या जात असत आणि युद्धाचे आह्वान डावलणे क्षात्र धर्मास धरून नसे, हेदेखील त्यामागे पाहता येते.

युधिष्ठिराने त्या पणाला होकार दिल्यावर झालेल्या द्यूतात युधिष्ठिर – आधीच्या द्यूतातल्या वीस पणांसारखा – हा नवा पणही हरला आहे.

द्यूत खेळायला जाण्याविषयी युधिष्ठिराच्या तोंडी दैव, पित्याची आज्ञा, आह्वान, व्रत आणि स्वधर्म ही कारणे आली आहेत, हे पाहून झाले. व्यासांनी कथेत गुंफलेल्या इतर गोष्टी लक्षात न घेता जर वरील प्रसंग वाचले तर असे वाटते की, युधिष्ठिराला खरे तर द्यूतही खेळायला जायचे नव्हते आणि अनुद्यूतही खेळायला जायचे नव्हते; तो – त्याच्या तोंडी असलेल्या कारणांमुळे – केवळ निरुपाय म्हणून किंवा केवळ धर्माचरण करायचे म्हणून द्यूत व अनुद्यूत खेळायला गेला होता. तथापि, युधिष्ठिर द्यूतास व अनुद्यूतास का गेला, त्याविषयी वैशंपायनांनी जनमेजयाला सांगितलेले त्यांचे स्वतःचे मत वेगळे असल्याचे लेखात वर येऊन गेले आहे. तसेच, युधिष्ठिर व त्याचे द्यूत ह्याविषयीची पांडवपक्षातल्या प्रमुख कथापात्रांची खासगीतली मते लेखाच्या उर्वरित भागात येत आहेत. द्यूतात जे काही घडले, त्याला कथेत एक वेगळा पदर असल्याचे लेखात आधी म्हटले आहे; तो पदर म्हणजे ती सारी मते. त्या पदरातून असे दिसते की, द्यूताच्या वेळच्या युधिष्ठिराच्या वागण्यात काहीतरी क्षात्र धर्म भरला असल्याचे पांडवपक्षातल्या काही प्रमुख कथापात्रांच्या तोंडी कथेत पुढे आले असले, तरी ते त्याचे मुख्यतः चारचौघांत सांगायचे मत आहे. द्यूत व अनुद्यूत खेळायला जाताना युधिष्ठिराने दिलेल्या कोठल्याच कारणाचा त्यांच्या तोंडी खासगीत बोलताना उल्लेख नाही. खासगीत बोलताना त्या सर्वांनाच युधिष्ठिराचे द्यूतातले वागणे – काही प्रसंगी तरी – अगदी वेगळ्या प्रकाशात दिसले आहे.

* * *

युधिष्ठिर आणि त्याचे द्यूत ह्यासंबंधी व्यासांनी पांडवपक्षातल्या प्रमुख कथापात्रांच्या तोंडी चारचौघांत, तसेच खासगीत घातलेल्या गोष्टींकडे पाहण्यास आपण द्रौपदीपासून सुरुवात करू या.

पार्श्वभूमी म्हणून, द्यूतातल्या विसाव्या डावानंतर कुरुसंसदेत घडलेल्या काही घटना प्रस्तुत आहेत.

शकुनीने द्यूतातला विसावा – द्रौपदीचा – पण जिंकल्यावर दुर्योधन विदुराला सांगतो की, द्रौपदीला आमचे घर झाडायला घेऊन जा आणि तिला आमच्या दासींबरोबर राहू दे. तथापि, विदुराने ते न करता, "माझ्या मते ती दासी झालेली नाही" असे म्हणून वर दुर्योधनाला तोंड केल्यावर दुर्योधन, 'धिगस्तु क्षत्तारम्' – क्षत्त्याचा (विदुराचा) धिक्कार असो – असे म्हणतो, आणि द्रौपदीला घर झाडायला नेण्यासाठी प्रातिकामीला – त्याच्या एका नोकराला – पाठवतो. (पांडवांची नाककापी करण्यासाठी द्रौपदीला भर सभेत आणायची, तिथे तिची विटंबना

करायची वगैरे गोष्टी दुर्योधन, दुःशासन व कर्ण ह्यांना त्या प्रसंगी पुढे सुचत गेल्या आहेत). दुर्योधनाच्या आज्ञेप्रमाणे प्रातिकामी पांडवांच्या अंतःपुरात द्रौपदीकडे जातो आणि, 'तुला दुर्योधनाने द्यूतात जिंकले आहे' असे सांगून, 'मी तुला धृतराष्ट्राच्या घरी काम करायला नेतो', असे म्हणतो. आपण ऐकत असलेल्या शब्दांवर द्रौपदीचा विश्वास न बसून, द्यूतात झालेल्या गोष्टींविषयी ती त्याला एक-दोन प्रश्न विचारते. त्यातून तिला समजते की, जेव्हा युधिष्ठिराकडे द्यूतात लावायला इतर काही शिल्लक राहिले नाही तेव्हा त्याने त्याच्या भावांना, त्यानंतर स्वतःला, आणि शेवटी तिला पणाला लावले; आणि ते सारेच्या सारे पण तो हरला. प्रातिकामीकडून हे समजल्यावर द्रौपदी त्याला सांगते की, कुरुसंसदेत परत जाऊन माझ्यातर्फे युधिष्ठिराला विचार :

किं नु पूर्वं पराजैषीरात्मानं मां नु भारत।

२.६०.७

– तू आधी कोणाला हरलास, तुला स्वतःला की मला?

'द्रौपदीचा प्रश्न' ह्या नावाने प्रसिद्ध असलेल्या त्या प्रश्नाचा मथितार्थ असा : मी कौरवांची दासी खरोखरच झाले आहे का?[१८]

थोडे स्पष्टीकरण देणे योग्य ठरेल. द्रौपदीने युधिष्ठिराला तिचा प्रश्न विचारण्यासाठी प्रातिकामीला परत पाठवण्यापूर्वीच तिला खरेतर समजले होते की, युधिष्ठिराने द्यूतात तिला पणाला लावण्यापूर्वी स्वतःला पणाला लावले होते, आणि ते दोन्ही पण तो हरला होता. तेव्हा, द्रौपदीचा प्रश्न प्रथमदर्शनी अर्थहीन वाटण्याची शक्यता आहे. त्या प्रश्नामागचा मुद्दा कळण्यासाठी दोन गोष्टी लक्षात घ्यायला हव्या : द्यूतात फक्त स्वतःचेच धन पणाला लावता येत असे; आणि द्रौपदीला पणाला लावताना ती युधिष्ठिराचे धन होती की नाही, ह्याविषयी दोन मते देता येतात. एक मत असे की, द्रौपदीला पणाला लावण्यापूर्वी युधिष्ठिर स्वतःच कौरवांचा दास झाला होता; आणि, त्या वेळच्या प्रथेप्रमाणे, दासाला स्वतःचे असे कोठलेही धन नसे. अतएव, द्रौपदीला पणाला लावताना ती युधिष्ठिराचे धन नव्हती. दुसरे मत असे की, त्या वेळच्या प्रथेप्रमाणे, पत्नी ही पतीचे – मग तो दास का असेना – धन असे. अतएव, द्रौपदीला पणाला लावताना ती युधिष्ठिराचे धन होती.

द्रौपदीने सांगितल्याप्रमाणे, प्रातिकामी कुरुसंसदेत परत येतो व तिचा प्रश्न युधिष्ठिराच्या कानी घालतो. तथापि, युधिष्ठिर त्यावर काही बोलत नाही. (द्रौपदीला पणाला लावल्या क्षणापासून युधिष्ठिर जो मूग गिळून बसला आहे, ते थेट कथेत पुढे धृतराष्ट्राने द्रौपदीला दिलेल्या वरांमुळे पांडवांची दास्यातून सुटका होऊन ते इंद्रप्रस्थाला परत जायला निघतात त्या क्षणापर्यंत.) ते पाहिल्यावर दुर्योधनाला पांडवांची, ते कौरवांचे दास झाल्याने आधीच झालेली त्यांची अप्रतिष्ठा नगण्य ठरेल अशा थराची अप्रतिष्ठा करण्याची एक नामी कल्पना सुचते : पांडवांच्या पट्टराणीचे – द्रौपदीचे – आपली दासी म्हणून भर सभेत प्रदर्शन करायचे. तो प्रातिकामीला सांगतो की, द्रौपदीला तिचा प्रश्न येथे येऊन विचारायला सांग. प्रातिकामीने द्रौपदीकडे परत जाऊन तिला तसे सांगितल्यावर ती, 'माझा प्रश्न कुरुसंसदेला विचार', असे सांगून त्याला परत पाठवते. तथापि, तिच्या प्रश्नावर संसदेतलेही कोणी बोलायला तयार होत नाही. ते पाहून दुर्योधन प्रातिकामीला पुन्हा सांगतो की, द्रौपदीला तिचा प्रश्न येथे येऊन विचारायला सांग. पण, ह्या वेळी प्रातिकामी द्रौपदीकडे परत जायला कचरतो; आणि ते पाहिल्यावर दुर्योधन दुःशासनाला सांगतो, "दुःशासना, तू स्वतः जा आणि तिला धरून इथे घेऊन'ये." दुःशासन जणू त्याच आज्ञेची वाट पाहत होता. तो डोळे तांबारून उठतो, पांडवांच्या अंतःपुरात जातो, आणि एकवस्त्रा व रजस्वला असलेल्या द्रौपदीचे केस धरून तिला फरफटत सभेत घेऊन येतो.

दुःशासन द्रौपदीला फरफटत नेत असताना घडलेल्या काही गोष्टी, द्रौपदी हे कथापात्र समजण्याच्या दृष्टीने, आणि त्या प्रसंगी पुढे घडलेल्या गोष्टींकडे पाहण्याचा तिचा दृष्टिकोण समजण्याच्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. प्रातिकामी तिच्याकडे प्रथम गेला तेथपासून पुढे घडत गेलेले सारे तिला अनपेक्षितच नाही, तर अतर्क्य होते. तथापि, द्रौपदी डगमगत नाही. तिला खेचून नेत असलेल्या दुःशासनाला ती प्रथम सांगून पाहते की, मी रजस्वला व एकवस्त्रा आहे आणि मला गुरुस्थानी असलेली मंडळी सभेत बसली असल्याने मी तेथे ह्या अवस्थेत

अनुक्रमणिका

जाणे योग्य नाही. पण हे सांगून दु:शासनावर काही परिणाम होत नाही हे दिसल्यावर ती म्हणते की, तुझे हे वागणे माझे पती कदापि सहन करून घेणार नाहीत. तसेच, तिला फरफटत न्यायला सुरुवात करण्यापूर्वी दु:शासनाने म्हटलेल्या, 'धर्मेण लब्धासि' – तू आम्हाला धर्माने मिळाली आहेत – ह्याला उत्तर म्हणून की काय, ती म्हणते :

धर्मे स्थितो धर्मसुतश्च राजा
धर्मश्च सूक्ष्मो निपुणोपलभ्य:।
वाचापि भर्तु: परमाणुमात्रं
नेच्छामि दोषं स्वगुणान्विसृज्य।। २.६०.३१

– धर्मसुत (युधिष्ठिर) राजा (सदोदित) धर्माने वागणारा आहे. धर्म सूक्ष्म असतो, आणि तो फक्त त्यात निपुण असलेल्यांनाच उमगतो. माझे गुण सोडून देऊन मी त्याला (युधिष्ठिराला) शब्दानेही अणुमात्र दोष देऊ इच्छीत नाही.

द्रौपदीचा भाव असा : धर्म कशाशी खातात ते कळणे तुझ्या अकलेबाहेरची गोष्ट आहे; त्याला माझा ज्येष्ठ नवरा हवा.

आपल्या पाच नवऱ्यांच्या पौरुषावर, आणि आपल्या ज्येष्ठ नवऱ्याच्या धर्मज्ञानावर द्रौपदी दाखवत असलेला गाढ विश्वास कितपत रास्त होता, ह्या प्रश्नाला व्यासांनी कथेत घातलेले उत्तर लेखात पुढे येतेच आहे. एक गोष्ट स्पष्ट आहे : व्यासांची द्रौपदी पिळाची आहे.

द्रौपदी दु:शासनाची निर्भर्त्सना करत आहे आणि दु:शासन तिला 'दासी!' म्हणत फरफटत नेतो आहे, हे थोडा वेळ झाल्यावर ते दोघे कुरुसंसदेत येऊन पोचलेले दिसतात. वैशंपायनांच्या वर्णनातून असे दिसते की, दु:शासन करत असलेली आपली विटंबना कुरुसंसदेतले कोणी तरी तात्काळ थांबवतील, अशी द्रौपदीची अपेक्षा असावी. तथापि, ती दोघे संसदेत पोचल्यावर तिला दिसते की, दु:शासन आपल्याला फरफटत आणतो आहे हे पाहूनही कोणी काही करत नाही – भीष्मद्रोणप्रभृती कुरूंपैकी कोणी नाही आणि आपल्या पाच पतींपैकीही कोणी नाही. आणि त्या एका क्षणात द्रौपदी पालटते. डोळ्यांसमोर घडत असलेला धडधडीत अधर्म सहन करून घेण्यावरून ती कुरुसंसदेचा धिक्कार तर करतेच. पण, काही क्षणांपूर्वी दु:शासनाला, 'तुझे हे वागणे माझे पती कदापि सहन करून घेणार नाहीत' हे ठासून सांगणाऱ्या द्रौपदीचा तिच्या पतींबद्दलचा भ्रम दूर होतो. तिने तिच्या पतींकडे संतापून जन्मात पहिल्यांदा पाहिले आहे ते येथे.

दु:शासनाने द्रौपदीला कुरुसंसदेत फरफटत आणून उभी केल्यावर तिच्या प्रश्नावरचे पहिले भाष्य भीष्मांचे आहे. भीष्म तिला म्हणतात : 'मला तुझ्या प्रश्नाचे उत्तर देता येत नाही.' स्पष्टीकरणार्थ, भीष्मांनी तिला तीन कारणे दिली आहेत. त्यांचे पहिले कारण आहे : तुला पणाला लावताना तू युधिष्ठिराचे धन होतीस की नाही, ते मला ठरवता येत नाही. पण द्रौपदीने कुरुसंसदेला विचारलेल्या प्रश्नामागे 'धन' एवढा एकच मुद्दा नाही, तिला द्यूतातला शेवटला डाव – कोठल्या तरी कारणाने – रद्द करून हवा आहे, हे भीष्मांना स्पष्ट आहे; आणि त्यांच्या उत्तराच्या उरलेल्या भागाकडे पाहता असे दिसते की, त्यांना तो डाव रद्द करायला जर काही कारण सापडले असते, तर त्यांनी ते केले असते. पण त्यांना त्यात दोन – त्यांच्या दृष्टिकोणातून अनुल्लंघनीय – अडचणी दिसल्या आहेत. एक तर, युधिष्ठिराने स्वत:च 'जितोऽस्मि' – मी जिंकला गेलो – असे म्हटले होते.[१९] युधिष्ठिराच्या त्या शब्दांमधला भीष्मांना दिसलेला भाव, 'युधिष्ठिराच्या मते, द्रौपदी जिंकली गेली आहे' हा असल्याचे दिसते. दुसरे म्हणजे, द्यूताच्या वेळचे युधिष्ठिराचे वागणे. ते द्रौपदीला सांगतात,

द्यूतेऽद्वितीय: शकुनिर्नरेषु
कुन्तीसुतस्तेन निसृष्टकाम:।
न मन्यते तां निकृतिं महात्मा
तस्मान्न ते प्रश्नमिमं ब्रवीमि।। २.६०.४२

– द्यूतात शकुनीचा हात धरणारा साऱ्या जगात कोणी नाही; (त्याच्याशी खेळायचे की नाही ते शकुनीने) युधिष्ठिराच्या स्वत:च्या इच्छेवर सोडले होते; आणि त्याने (शकुनीने) काही निकृति – चलाखी, कपट, लबाडी – केली असे महात्मा (युधिष्ठिर) मानत नाही. त्यामुळे तुझ्या प्रश्नाचे उत्तर मला देता येत नाही.[२०]

भीष्मांच्या तोंडच्या 'निसृष्टकाम' – स्वत:च्या इच्छेवर सोडून दिलेला – ह्या शब्दात, शकुनीने युधिष्ठिराला द्यूतापूर्वी





देवनाद्विनिवर्तस्व यदि ते विद्यते भयम्।।
२.५३.१२

– जर तुला (मी निकृतीने खेळतो असे वाटून) भय वाटत असेल तर तू (माझ्याशी) खेळू नकोस. असे म्हटले होते, त्याचा संदर्भ आहे. शकुनी व युधिष्ठिर ह्यांच्यामधले ते संभाषण लेखात आधी येऊन गेले आहे.

ते कसेही असो; भीष्मांच्या भाषणावरून हे उघड आहे की, युधिष्ठिर द्यूतात हरला ह्यात ते शकुनी किंवा दुर्योधन ह्यांना दोषी धरत नसून युधिष्ठिराला दोषी धरत आहेत. खाल्ल्या मिठाला जागायचे म्हणून भीष्म तसे म्हणत आहेत की ते म्हणत आहेत त्यात काही तथ्य आहे, हा प्रश्न व्यासांनी आपल्यावर सोडला आहे. तथापि, भीष्म खाल्ल्या मिठाला जागायचे म्हणून मध्ये पडले नाहीत असे जरी आपण मानले, तरी तेवढ्याने त्याविषयीचे प्रश्न संपत नाहीत. कौरवांनी केलेली द्रौपदीची विटंबना हा अधमपणा आहे. तथापि, दुष्प्रवृत्त लोक दुष्कर्मे करू शकतील अशी परिस्थिति निर्माण केल्यावर जर त्या लोकांनी खरोखर दुष्कर्मे केली, तर त्यात नवल वाटण्यासारखे काय आहे? चूक ती परिस्थिती निर्माण करणाऱ्याची नसते का? कौरव द्रौपदीची भरसभेत विटंबना करू शकतील अशी परिस्थिती निर्माण करण्यात भीष्मांचा हात नव्हता. तेव्हा, कुरुसंसदेत जे काही घडले त्याचा सारा दोष भीष्मांच्या माथी मारणे कितपत योग्य आहे? प्रस्तुत लेख वाचून झाल्यावर वाचकाने वरील प्रश्न स्वत:ला अवश्य विचारावा.[२१-२२]

घडत असलेल्या प्रसंगाकडे वळूया. द्रौपदीला भीष्मांचे म्हणणे, अर्थातच, पटत नाही. तिच्या मते, द्यूतातल्या शेवटल्या डावाचे निष्पन्न – खरे तर, साऱ्या द्यूताचेच निष्पन्न – कोणी तरी रद्द करायला हवे आहे. तथापि, भीष्मांच्या तोंडचे शब्द ऐकल्यावर, आपण 'धन' हा प्रश्न उभा करून द्यूतातला शेवटला डाव रद्द केला जाणार नाही असे जाणवून की काय, ती त्यांच्या म्हणण्यातल्या शेवटल्या भागावर – विशेषत:, त्यातल्या 'निसृष्टकाम' ह्या शब्दावर – आता केंद्रित होते. ती भीष्मांना म्हणते :

आहूय राजा कुशलैः सभायां
दुष्टात्मभिर्नैकृतिकैरनार्यैः।
द्यूतप्रियैर्नातिकृतप्रयत्नः
कस्मादयं नाम निसृष्टकामः।।
स शुद्धभावो निकृतिप्रवृत्तिम्
अबुध्यमानः कुरुपाण्डवाग्र्यः।
संभूय सर्वैश्च जितोऽपि यस्मात्
पश्चाच्च यत्कैतवमभ्युपेतः।। २.६०.४३-४

– राजाला (युधिष्ठिराला) त्या दुष्टात्म्या, कपटी व द्यूतप्रिय अनार्यांनी सभेत आह्वान दिले. ह्याला (युधिष्ठिराला) द्यूत खेळण्याची फारशी सवय नाही. (अशा परिस्थितीत) ह्याला तुम्ही 'निसृष्टकाम' कसे म्हणता? कुरूंमध्ये व पांडवांमध्ये अग्रणी असलेला हा (माणूस) शुद्ध स्वभावाचा असल्याने त्याला फसवाफसवीची प्रवृत्ती समजत नाही. ह्या सर्वांनी एकत्र होऊन त्याला आधी जिंकले; आणि त्यानंतरही तो (मला पणाला लावून) आणखी खेळला.

भीष्मांना आणखी काही म्हणायला जाण्यात अर्थ नाही असे वाटून की काय, ह्यानंतर द्रौपदी कुरुसंसदेला, 'माझ्या प्रश्नाचे असंदिग्ध उत्तर द्या', असे पुन्हा म्हणते. तथापि, त्यावरही कोणी काही बोलत नाहीत. आपल्यावर गुदरलेल्या परिस्थितीचे खरे स्वरूप द्रौपदीला येथे स्पष्ट होऊन तिच्या मनाचा बांध ढासळतो आणि तिला रडू कोसळते.

कुरुसंसदेत घडलेल्या पुढच्या घटनांकडे वळण्यापूर्वी एक गोष्ट वाचकाच्या नजरेस आणून देणे योग्य ठरेल. द्रौपदी भीष्मांशी कितीका आत्मविश्वासाने बोलली असेना, द्यूतात घडलेल्या घटनांविषयी प्रातिकामीकडून कळलेली त्रोटक माहिती सोडून तिला त्या वेळी आणखी काही माहीत नव्हते. द्यूतात काय घडले त्याचे तपशील तर सोडा, युधिष्ठिराशी कौरवांच्या बाजूने शकुनी द्यूत खेळला, ह्याचीही – भीष्मांनी सांगेपर्यंत – तिला कल्पना नव्हती. तरीही, युधिष्ठिर द्यूतात हरला एवढ्यावरूनच द्यूतात खरे काय घडले ते, तिच्या मते, तिला माहीत आहे. ... आमच्या बाब्या भोळा आहे; त्याला त्या हलकट ठकांनी फसवून लुबाडले! ... भाव असा की, ह्या कारणाने सारे द्यूत – निदान त्यातला शेवटला डाव तरी – रद्द ठरवला जायला हवा. तिचा तो 'निकृतिप्रवृत्तिमबुध्यमानः' – फसवाफसवीची प्रवृत्ती न समजणारा – नवरा त्या

हलकट ठकांशी द्यूत खेळायला गेला कशाला, आणि त्यांच्याशी खेळताना त्याने तिला पणाला लावले कशाला, असले प्रश्न तिला नुसते अप्रस्तुतच नाहीत तर चुकीचे वाटलेले दिसतात.

'आमचा बाब्या भोळा आहे; त्याला त्या हलकट ठकांनी फसवून लुबाडले!', हा द्यूताकडे पाहण्याचा दृष्टिकोण कथेत फक्त द्रौपदीलाच सुचला आहे असे नाही. चारचौघांत बोलताना पांडवपक्षाला द्यूतात जेव्हा अधर्म किंवा तसेच काहीतरी निंद्य दिसते, तेव्हा त्यांना सामान्यतः हाच भाव अभिप्रेत असतो.

द्रौपदीला पणाला लावण्यापूर्वी युधिष्ठिराने स्वतःला पणाला लावल्यामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीचा एक वेगळा पैलू कथेच्या दृष्टीने येथे प्रस्तुत आहे. द्रौपदीला पणाला लावताना युधिष्ठिर तिचा ईश – धनी – होता असे ठरले, तर द्रौपदी कौरवांची दासी होणार होती. तथापि, द्रौपदीला पणाला लावताना युधिष्ठिर तिचा ईश नव्हता (आणि पर्यायाने, त्या वेळी ती त्याचे धन नव्हती) असे ठरल्यास युधिष्ठिर कोठल्या तरी अर्थाने 'अनृत' खोटा – ठरणार होता. तेव्हा, एक तर द्रौपदी कौरवांची दासी झाल्याचे ठरणार होते; नाही तर युधिष्ठिर खोटा पडणार होता, अशी ही परिस्थिती आहे. प्रस्तुत प्रसंगी पुढे दुर्योधनाला असे जाणवते की, स्वतःविषयी फार उच्च, म्हणजे थेट आभाळाला भिडण्याइतके उच्च, मत असलेल्या[२३] ह्या माणसाला चारचौघांत खोटा पाडण्याची ही उत्तम संधी आहे; एवढेच नव्हे तर, त्यातून युधिष्ठिराची – आणि पर्यायाने, साऱ्याच पांडवांची – जी नाककापी होईल ती, द्रौपदीला आपली दासी करून ठेवण्यात होणाऱ्या पांडवांच्या नाककापीहून त्यांना अधिक झोंबेल. मग तो एका अटीवर द्रौपदीची दास्यातून सुटका करण्याचे कुरुसंसदेत कबूल करतो.[२४] ती अट अशी : एक तर, द्रौपदीला पणाला लावताना मी तिचा ईश नव्हतो असे युधिष्ठिराने स्वतः कबूल करायचे; नाही तर, त्या वेळी तो तिचा ईश नव्हता असे उरलेल्या चारही पांडवांनी म्हणायचे. दुर्योधनाचे म्हणणे ऐकल्यावर, 'द्रौपदीच्या प्रश्नाला उत्तर देण्याच्या पेचातून आपण सुटलो', हे दिसून कुरुसंसदेतल्या सर्वांनाच हायसे वाटते. ते सारेजण आता पांडव पुढे काय करतात ते पाहू लागतात. दुर्योधनाच्या म्हणण्यावर युधिष्ठिर अवाक्षर उच्चारत नाही. (द्रौपदीला पणाला लावताना युधिष्ठिर तिचा ईश होता की नाही, ह्याविषयीचे त्याचे स्वतःचे मत संहितेत कोठे आलेले नाही.) उरलेल्या चार पांडवांपैकी कोणीही युधिष्ठिराला खोटा पाडायला तयार होत नाही – मग द्रौपदीचे काय व्हायचे असेल ते खुशाल होओ![२५]

कुरुसंसदेत आता अशी परिस्थिती येते की, द्रौपदीच्या प्रश्नाला संसदेतले कोणीच असंदिग्ध उत्तर देऊ इच्छीत नाही आणि पांडवही त्यावर निर्णायक काही बोलायला तयार होत नाहीत. नेमक्या ह्या वेळी, धृतराष्ट्राच्या घरी अनेक प्रकारचे अपशकुन होतात आणि ते पाहून घाबरलेला धृतराष्ट्र द्रौपदीला वर मागायला सांगतो. द्रौपदीने मागितलेला वर तिच्या व्यक्तिमत्त्वावर व तिच्या त्या वेळच्या मनोव्यापारांवर प्रकाश टाकणारा आहे. तो वर असा :

सर्वधर्मानुगः श्रीमानदासोऽस्तु युधिष्ठिरः।।

२.६३.२

– सर्व धर्मांचे पालन करणारा श्रीमान् युधिष्ठिर 'अदास' – दास नाही असा – होओ.

ती तेवढेच बोलून थांबली असती तर तिच्या तोंडच्या 'सर्वधर्मानुगः' – सर्व धर्मांचे पालन करणारा – आणि 'श्रीमान्' ह्या विशेषणांमधली खोच कोणाच्या लक्षात आली नसती. पण, आपण तो वर का मागतो आहोत त्याचे कारण द्रौपदीने पुढच्याच दोन श्लोकांमध्ये दिले आहे. ते कारण आहे : प्रतिविन्ध्य – द्रौपदीचा थोरला, तिला युधिष्ठिरापासून झालेला मुलगा. ती म्हणते,

मनस्विनमजानन्तो मा वै ब्रूयुः कुमारकाः।
एष वै दासपुत्रेति प्रतिविन्ध्यं तमागतम्।।
राजपुत्रः पुरा भूत्वा यथा नान्यः पुमान्क्वचित्।
लालितो दासपुत्रत्वं पश्यन्नश्येद्धि भारत।।

२.६३.२९-३०

– अजाण पोराटोरांनी मानी प्रतिविन्ध्याला येताना पाहून, 'हा दासपुत्र (येतो) आहे' असे म्हणू नये म्हणून. भारता,[२६] कधी कोणी माणूस (वाढला) नसेल इतक्या लाडात वाढलेला, आणि आधी राजपुत्र असलेला तो (प्रतिविन्ध्य), आपल्याला दासपुत्रत्व आल्याचे पाहून विनष्ट होईल.

द्रौपदीने पहिल्या संधीला युधिष्ठिराला 'अदास' केला

आहे खरा; पण, त्या ठकांनी ह्या भोळ्या माणसाला बनवले म्हणून नाही! हा माणूस धर्मात्मा आहे म्हणून नाही! हा माणूस माझा नवरा आहे म्हणूनही नाही! तर, हा माणूस माझ्या प्रतिविन्ध्याचा बाप आहे, आणि आपण दासपुत्र झाल्याचे पाहून ते मानी पोर कुढून मरेल म्हणून!

द्रौपदीने मागितलेला वर हा, खरे म्हणजे, तिला पणाला लावणाऱ्या तिच्या ज्येष्ठ नवऱ्याचा तिने भर सभेत केलेला जहरी अपमान आहे.[२७]

युधिष्ठिर द्यूत खेळला त्यात – विशेषतः, त्याने तिला पणाला लावले ह्यात – द्रौपदीला कथेत पुढे क्षात्रधर्म किंवा तसलेच दुसरे काहीतरी उदात्त कधीही दिसलेले नाही. तथापि, हेदेखील खरे आहे की, त्या वेळच्या प्रथेप्रमाणे ती त्याचे धन होती म्हणून असो किंवा दुसऱ्या कोठल्या कारणाने असो, युधिष्ठिराने तिला पणाला लावल्यावरून द्रौपदीने त्याला स्पष्ट शब्दांमध्ये कधी दोष दिलेला नाही.

द्रौपदीच्या मागणीला धृतराष्ट्राने होकार देऊन झाल्या-वर, आणि त्याने द्रौपदीला आणखी एक वर मागायला सांगितल्यावर तिने उरलेल्या चार पांडवांना, त्यांच्या शस्त्रांसह व रथांसह सोडवले आहे.

आपण कौरवांची दासी झालो आहोत असे द्रौपदीला वाटत नव्हते म्हणून की काय, 'माझी दास्यातून सुटका व्हावी', असले काही तिने मागितलेले नाही.

ह्यानंतर, युधिष्ठिराने धृतराष्ट्राला 'आता आम्ही काय करावे?', असे विचारल्यावर, द्यूतात पांडवांचे जे काही गेले होते ते सारे परत करून धृतराष्ट्र त्याला हास्तिनपुराला परत जाण्यास अनुज्ञा देतो. द्यूताचे उत्तरवृत्त येथे संपते.

युधिष्ठिर व त्याचे द्यूत ह्या गोष्टी द्रौपदीला कथेत पुढे कशा दिसल्याचे व्यासांनी रचले आहे, त्याकडे वळूया.

कौरव आपली विटंबना करत असल्याचे दिसूनही आपले पती मध्ये पडले नसल्याचे पाहून द्रौपदीला वाटलेले वैषम्य तिने कुरुसंसदेत स्पष्ट शब्दांमध्ये व्यक्त केले होते.[२८] ते वैषम्य अधिक स्पष्टपणे जाणवते, ते आरण्यक-पर्वाच्या सुरवातीला घडलेल्या एका प्रसंगी. पांडव द्यूतात हरून वनवासाला गेले हे यादवांना आणि पांचालांना लवकरच कळते; आणि कृष्ण, बलराम, धृष्टद्युम्न वगैरे आप्तेष्ट मंडळी पांडवांची वनात भेट घेतात. त्या प्रसंगी कृष्णाशी बोलताना द्रौपदीने तिचे मन उघडे केले आहे. ती म्हणते :

> गर्हये पाण्डवांस्त्वेव युधि श्रेष्ठान्महाबलान्।
> ये क्लिश्यमानां प्रेक्षन्ते धर्मपत्नीं यशस्विनीम्।।
> धिग्बलं भीमसेनस्य धिक्पार्थस्य धनुष्मताम्।
> यौ मां विप्रकृतां क्षुद्रैर्मर्षयेतां जनार्दन।।
> शाश्वतोऽयं धर्मपथः सद्भिराचरितः सदा।
> यद्भार्यां परिरक्षन्ति भर्तारोऽल्पबला अपि।।
>
> ३.१३.५८-६०

– महाबली व युद्धात श्रेष्ठ असलेल्या पांडवांना मी दोष देते : आपल्या यशस्विनी धर्मपत्नीला क्लेश दिले जात असताना ते नुसते पाहत राहिले. जनार्दना, भीमाच्या बलाचा धिक्कार असो! आणि धनुर्विद्येतील अर्जुनाच्या नैपुण्याचाही धिक्कार असो! ते क्षुद्र करत असलेला माझा छळ ह्या दोघांनी सहन करून घेतला. पती दुर्बल असला तरीही त्याने आपल्या पत्नीचे रक्षण करायचे असते, हा सज्जनांनी सतत आचरलेला शाश्वत धर्म आहे.

अपमान आणि असहायता, अपेक्षाभंग आणि कटुता, दुःख आणि संताप – द्रौपदीच्या मनातले हे सारे भाव तिच्या ह्या शब्दांतून आज अडीच हजार वर्षांनंतरही आपल्यापर्यंत पोचतात.

धिक्कार असो तुमच्या पौरुषाचा![२९]

कृष्णाशी बोलताना झालेला मनःक्षोभ द्रौपदी शेवटी आवरते, आणि डोळे पुनःपुनः पुसत भरल्या आवाजात त्याला म्हणते, 'मला बाप नाही की भाऊ नाहीत; पती नाहीत की पुत्र नाहीत; आणि, कृष्णा, मला तूसुद्धा नाहीस!'

भरल्या घरच्या भारतीय स्त्रियांचे, 'म्हणायला मला सारेजण आहेत; पण खरे तर मला कोणी नाही!' हे शब्द किती जुने आहेत. द्रौपदीवर काय गुदरली ते, महाभारताच्या पुरुषप्रधान कथाविश्वात फक्त एका व्यक्तीला जाणवले आहे – कुंती.[३०]

वरील प्रसंगाविषयी निदान एक गोष्ट म्हणता येते : द्यूतात सारे काही घालवण्यावरून द्रौपदीने त्या वेळी

युधिष्ठिराला दोष लावलेला नाही. निदान स्पष्ट शब्दांमध्ये तरी नाही. तथापि, युधिष्ठिर ज्या प्रकारे द्यूत खेळला त्यातही तिला दोष दिसला आहे, हे वरील प्रसंगानंतर काही दिवसांनी द्रौपदी, भीम व युधिष्ठिर ह्यांच्यामध्ये झालेल्या विवादात दिसते; (३.२८-३७). त्यांच्यातला तो विवाद, आपण आता पुढे काय करावे त्याविषयी होता.

विवादाला सुरुवात द्रौपदी आणि युधिष्ठिर ह्यांच्यात दोन शब्द होण्यापासून होते. ह्या प्रसंगी द्रौपदी शांतपणे बोलत होती. तिचा मुद्दा होता : युधिष्ठिराने निष्क्रियपणे दिवस न काढतां क्षात्र धर्मानुसार कौरवांना तेज दाखवायला हवे आणि राज्य परत मिळवण्यासाठी काहीतरी करायला हवे. तिच्या म्हणण्यावर उत्तर म्हणून युधिष्ठिराने जेव्हा क्षमेची महती व सनातन धर्म ह्यांवर व्याख्यान दिले. तेव्हा तिने दिलेल्या प्रत्युत्तराची सुरुवातच आहे, "तुला अशा प्रकारे मोहात पाडणाऱ्या त्या विधात्याला माझा नमस्कार असो; पूर्वजांसारखे राज्य करण्याऐवजी तुझी बुद्धी भलतीकडेच चालली आहे." युधिष्ठिर सत्प्रवृत्त आहे आणि त्याला धर्म महत्त्वाचा वाटतो, ह्याची तिला जाणीव आहे. द्यूतात जे घडले त्यातला दुर्योधनादींचा दोषही तिला स्पष्ट दिसतो आहे. तथापि, युधिष्ठिराने द्यूतात केलेल्या गोष्टींनी ती बुचकळ्यात पडली आहे. ती म्हणते :

राजन्परीतया बुद्ध्या विषमेऽक्षपराजये।
राज्यं वसून्यायुधानि भ्रातॄन्मां चासि निर्जितः।।
ऋजोर्मृदोर्वदान्यस्य ह्रीमतः सत्यवादिनः।
कथमक्षव्यसनजा बुद्धिरापतिता तव।।

३.३१.१७-८

– राजा, विपरीत बुद्धी होऊन विषम द्यूताच्या वेळी तू पराजित झालास; आणि राज्य, संपत्ती, आयुधे, तुझे भाऊ व मी हे सारे हरलास. तू सरळ स्वभावाचा, मृदू अंतःकरणाचा, उदार, विनयशील व सत्यवक्ता आहेस. तुला ही 'अक्षव्यसनजा' बुद्धी कोठून सुचली?

'अक्षव्यसनजा' ह्या शब्दाचा वेगवेगळ्या भाषांतरकारांनी वेगवेगळा अर्थ लावला आहे. आम्हाला दिसणारा अर्थ असा : द्यूताच्या व्यसनातून निर्माण होणारी.[३१]

आपली विटंबना होत असल्याचे दिसूनही आपल्या पतींनी ते खपवून घेतले, ह्याहून हे वेगळे आहे. पांडवांची झालेली दारुण सद्यःपरिस्थिती केवळ त्या नालायक ठकांच्या फसवाफसवीमुळे झालेली नाही – त्यात ह्या सत्प्रवृत्त माणसाचा स्वतःचाही काहीतरी हात आहे ह्याची द्रौपदीच्या तोंडची दखल कथेत प्रथम आली आहे ती येथे. तथापि, युधिष्ठिराला तशी बुद्धी होण्यात तिला – निदान प्रस्तुत भाषणात तरी – युधिष्ठिराचा हात दिसण्याऐवजी मुख्यतः विधात्याचा हात दिसला आहे, असे म्हणता येते. कारण, युधिष्ठिरासारख्या सत्प्रवृत्त माणसाला आपत्तीत घालायचे आणि दुर्योधनासारख्या नालायक माणसाला समृद्धी द्यायची, ह्या विधात्याच्या अजब करणीवरून त्याच भाषणात तिने विधात्यालाही बोल लावला आहे.

द्रौपदीच्या वरील उद्गारांवर व्यासांनी सोडून दिले असते, तर तिच्याच नव्हे तर पांडवांच्याही आयुष्यातल्या त्या महत्त्वाच्या घटनेविषयीचे तिचे स्वतःचे मत आपल्याला नीट उमगले नसते. हे लक्षात घेऊन की काय, युधिष्ठिर आणि त्याचे द्यूत ह्याविषयी द्रौपदीने तिचे मत ज्यात असंदिग्ध शब्दांमध्ये व्यक्त केले आहे, असाही एक प्रसंग व्यासांनी कथेत पुढे घातला आहे. विराटपर्वातल्या त्या प्रसंगी ती भीमाशी, कीचक तिच्या कच्छपी लागून तिला देत असलेल्या त्रासाविषयी बोलत होती. दुसरे कोणी ऐकायला जवळ नसतानाच्या त्या प्रसंगी, युधिष्ठिराविषयी तिच्या मनात असलेले किती काय तिच्या तोंडून बाहेर पडले असल्याचे दिसते.

त्या प्रसंगीचे तिच्या तोंडचे पहिलेच शब्द आहेत :

अशोच्यं नु कुतस्तस्या यस्या भर्ता युधिष्ठिरः।

४.१७.१

– युधिष्ठिर जिचा पती आहे तिला 'अशोच्य' कोठून असायचे?

'अशोच्य' म्हणजे शोचनीय नाही अशी अवस्था.

असहायता, कटुता व दुःख हे सारे काही ह्या उद्गारांमध्येही आहे.

द्यूतात घडलेल्या गोष्टींविषयीचे तिचे शब्द आहेत :

भ्रातरं च विगर्हस्व ज्येष्ठं दुर्द्यूतदेविनम्।
यस्यास्मि कर्मणा प्राप्ता दुःखमेतदनन्तकम्।।
को हि राज्यं परित्यज्य सर्वस्वं चात्मना सह।








प्रव्रज्यायैव दीव्येत विना दुर्द्यूतदेविनम्।।

४.१७.१०-१

– (ह्या साऱ्याबद्दल) तुझ्या त्या 'दुर्द्यूतदेविन्' मोठ्या भावाला दोष दे. त्याने केलेल्या कर्मानेच मी ह्या कधी न संपणाऱ्या दु:खात पिचते आहे. एक 'दुर्द्यूतदेविन्' सोडून दुसरा कोण बरे राज्यावरच नाही तर, स्वत:सह सर्वस्वावर पाणी सोडून (वनात) जाण्याचा डाव खेळेल?

द्रौपदीच्या तोंडचे 'दुर्द्यूतदेविन्' हे विशेषण अपशब्दात्मक आहे. त्याचा शब्दार्थ 'फसवाफसवीने द्यूत खेळणारा' हा असला तरी, प्रस्तुत संदर्भात त्यातला भाव 'जुगारडा' हा आहे.[३२]

"हा जर हजार हजार सोन्याची नाणी लावत सकाळ-संध्याकाळ खेळत बसला असता तरी, त्याला त्याच्या-जवळचे धन कित्येक वर्षे पुरले असते", असे सांगून द्रौपदी भीमाला पुढे म्हणते,

सोऽयं द्यूतप्रवादेन श्रिया प्रत्यवरोपितः।
तूष्णीमास्ते यथा मूढः स्वानि कर्माणि चिन्तयन्।।

४.१७.१४

– द्यूताच्या नावाखाली संपत्तीपासून भ्रष्ट केला गेल्यावर आता बसला आहे हा एखाद्या मूर्खासारखा चुपचाप स्वत:ची कृत्ये आठवत!

ह्या साऱ्याबरोबर, पांडवांची व तिची स्वत:ची झालेली अवस्था पाहून तिला होत असलेले दु:खही द्रौपदीने भीमाला रडत रडत सांगितले आहे.

द्रौपदीचे म्हणणे ऐकल्यावर, विराटाच्या सभेत कीचकाने द्रौपदीला आपल्या समक्ष लाथ मारली तेव्हा युधिष्ठिराचे ऐकून आपण उगीच निमुट बसलो, आपण कीचकाचा तेव्हाच वध करायला हवा होता, असे भीमाला वाटले आहे. एवढेच नव्हे तर, आपले राज्य हिरावण्यात आले तेव्हाच आपण दुर्योधन, कर्ण, शकुनी आणि दु:शासन ह्यांचा वध करायला हवा होता, असेही त्याला वाटले आहे. त्याने द्रौपदीला हे सारे सांगितलेही आहे. पण ह्या साऱ्याबरोबर त्याने द्रौपदीला हेदेखील सांगितले आहे की, युधिष्ठिराने तुझ्याकडून जर हा 'समुपालम्भ' – ठपका – ऐकला तर तो जीव देईल.

भीमाने 'समुपालम्भ' हा शब्द काढण्यापूर्वी द्रौपदीच्या तोंडी येऊन गेले होते की, जे घडले त्याविषयी ती विधात्याला दोष लावत होती. तसेच, बालपणी अजाणपणे आपण विधात्याचा काहीतरी फार मोठा अपराध केला असला पाहिजे आणि त्याची शिक्षा म्हणून आपल्याला हे सारे भोगावे लागते आहे, असेही तिला वाटले होते. तथापि, लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे, द्रौपदीच्या तोंडून दैव, विधाता हे सारे ऐकल्यावरही भीमाला तिच्या शब्दांमध्ये दिसलेला भाव आहे – 'समुपालम्भ'.

आता, भीमाच्या तोंडच्या जीव देण्याच्या गोष्टी ऐकून की काय, द्रौपदी भीमाला म्हणते :

आर्तयैतन्मया भीम कृतं बाष्पविमोक्षणम्।
अपारयन्त्या दु:खानि न राजानमुपालभे।।
विमुक्तेन व्यतीतेन भीमसेन महाबल।
प्रत्युपस्थितकालस्य कार्यस्यानन्तरो भव।।

४.२०.१४-५

– भीमा, दु:खे असह्य होऊन आर्त झाल्याने मी अशी रडले. मी राजाला (युधिष्ठिराला) दोष देत नाही. पण महाबली भीमसेना, होऊन गेले ते गेले. आता सांप्रत जे कार्य करायला हवे, त्यासाठी सज्ज हो.

प्रतिविन्ध्य हे कारण सांगून युधिष्ठिराला दास्यातून सोडवणारी द्रौपदी आता 'न राजानमुपालभे' – मी युधिष्ठिराला दोष देत नाही – असे म्हणते आहे खरी; पण ते ती मनापासून म्हणते आहे की सारवासारव करण्यासाठी म्हणते आहे, हा प्रश्न विचारात पाडणारा आहे.

कीचक आपल्याला देत असलेल्या त्रासाविषयी द्रौपदीने भीमाला स्पष्ट कल्पना दिली होती. पण, आपण एवढे सारे सांगूनही भीम त्यावर काही करेल, अशी द्रौपदीला खात्री वाटलेली दिसत नाही. ती त्याला मग, 'उद्या सूर्योदयाच्या वेळी कीचक जिवंत असेल, तर मी विष पिऊन जीव देईन', असे म्हणून ढसाढसा रडायला लागते. ते पाहून भीम तिचे सांत्वन करतो; आणि त्यांचे बोलणे मग, कीचकाचा काटा कसा काढायचा त्याकडे वळते.

दु:शासन द्रौपदीला कुरुसंसदेत फरफटत नेत असताना त्याला ती मोठ्या ठसक्यात म्हणाली होती की, 'धर्मे स्थितो धर्मसुतश्च राजा', आणि भीष्मांना ती तेवढ्याच ठसक्यात म्हणाली होती की, 'स शुद्धभावो निकृतिप्रवृत्तिम-

अनुक्रमणिका

बुध्यमानः .... संभूय सर्वेश्च जितः'. तिचे ह्या प्रसंगीचे उद्गार किती वेगळे आहेत!

(लेखाचा उत्तरार्ध पुढच्या अंकात येत आहे.) .

* * *

## परिशिष्ट १

द्यूत म्हटले की, आपल्या डोळ्यांसमोर पट, सोंगट्या, आणि फासे किंवा कवड्या येतात. तथापि, शकुनी आणि युधिष्ठिर ह्यांच्यामधले द्यूत अगदी वेगळ्या साधनांनी खेळले गेले होते. ते द्यूत ज्या साधनांनी व नियमांनी खेळले गेले होते, त्यांविषयी व द्यूताला संलग्न असलेल्यां अक्षहृदय नामक विद्येविषयी थोडी माहिती पुरवणे, हा प्रस्तुत परिशिष्टाचा उद्देश आहे.[३३]

शकुनी आणि युधिष्ठिर ह्यांच्यामधल्या द्यूताचे वैशंपायनांच्या तोंडी असलेले वर्णन नाट्यपूर्ण असले, तरी त्या वर्णनावरून ते द्यूत कोणत्या साधनांनी व कसे खेळले गेले होते, ते पुरेसे स्पष्ट होत नाही. तसेच, त्यातल्या विविध गोष्टींविषयीचे नियम काय होते – उदाहरणार्थ, डावातली हारजीत कशी ठरवली गेली होती – तेही स्पष्ट होत नाही. तथापि, त्या द्यूताविषयी संहितेत विविध ठिकाणी आलेल्या उल्लेखांचा अभ्यास केल्यास महाभारतकाळी द्यूत कोठल्या साधनांनी व नियमांनी खेळले जात असे, त्याविषयी काही अंदाज बांधता येतात. ते अंदाज असे :

द्यूत सामान्यतः दोन खेळाडूंमध्ये खेळले जाई. द्यूतात पट किंवा त्यासारखे दुसरे काही नसे. त्याच्याऐवजी जमीन थोडीशी उकरून तयार केलेली खोलगट जागा असे. द्यूतासाठी वापरायच्या त्या खोलगट जागेला अधि-देवन म्हणत. सोंगट्या, आणि फासे किंवा कवड्या ह्यांऐवजी वापरण्यात येणारी गोष्ट होती – बेहड्याच्या (विभीतकाच्या) झाडाची फळे. त्यांना अक्ष म्हणत. अक्ष – आपण सध्या फासे किंवा कवड्या वापरतो त्यांच्यासारखे मोजके दोन किंवा चार नसत. खेळाडूंजवळ अक्षांचा ढीग असे. प्रत्येक खेळाडूने त्याची खेळी आली की, त्याला योग्य वाटतील तितके अक्ष त्या ढिगातून घेऊन अधिदेवनावर टाकायचे असत. अधिदेवनावर दोन्ही खेळाडूंचे एकेकदा अक्ष टाकून झाले की, एक डाव संपे. त्या डावात कोण जिंकला ते ठरवण्यासाठी वापरली जाणारी पद्धत अशी : त्या डावात अधिदेवनावर टाकल्या गेलेल्या एकूण अक्षांची संख्या सम असणार आहे की विषम, हे दुसरी खेळी असलेल्या खेळाडूने त्याची खेळी खेळण्यापूर्वी सांगावे लागे. त्याने सांगितल्याप्रमाणे ते सम किंवा विषम निघाले तर तो जिंकला, नाही तर त्याचा प्रतिस्पर्धी जिंकला असे ठरे.[३४] प्रथम कोणी खेळायचे ते कसे ठरवत असत, ते उपलब्ध माहितीवरून स्पष्ट होत नाही.

पणाला लावलेल्या गोष्टीला 'पाण' म्हणत. पहिल्या डावात दोन्ही खेळाडू सारख्याच मोलाचे 'पाण' लावत. पुढच्या डावांमध्ये 'पाण' कसे लावले जात त्याविषयी एवढे उघड आहे की, आधीच्या डावात हरलेल्या खेळाडूला नवीन डावासाठी नवा 'पाण' लावावा लागे. आधीच्या डावात जिंकलेल्या खेळाडूचा नव्या डावासाठी 'पाण' कसा ठरवत, ते उपलब्ध माहितीवरून स्पष्ट होत नाही. शकुनी आणि युधिष्ठिर ह्यांच्यामध्ये झालेल्या द्यूताचे जे वर्णन संहितेत आहे त्याच्याशी सुसंगत असलेला एक तर्क असा : आधीच्या डावात जिंकलेल्या खेळाडूचा, त्याने त्या डावात जिंकलेली गोष्ट नवीन डावासाठी 'पाण' असे; आणि आधीच्या डावात हरलेल्या खेळाडूला निदान त्याच्या आधीच्या 'पाणाच्या मोलाचा नवीन 'पाण' लावावा लागे. दुसरेही तर्क शक्य आहेत.

वर दिलेल्या माहितीवरून हे उघड आहे की, द्यूत हा खेळ गणनाकौशल्यावर – अधिदेवनावर पहिल्या खेळाडूने ओतलेल्या अक्षांच्या ढिगातले अक्ष आणि आपण अधिवेशनावर ओतत असलेल्या ढिगातले अक्ष ह्यांची बेरीज सम असणार आहे की विषम, ते दुसऱ्या खेळाडूने अचूक ओळखण्याच्या कौशल्यावर – बसवलेला होता. त्या कौशल्याशी निगडित असलेल्या अक्षहृदय नामक विद्येविषयी आता दोन शब्द.

अक्षहृदय विद्येचा उल्लेख आरण्यकपर्वात वर्णिलेल्या नलोपाख्यानात आला आहे. बृहदश्व ऋषींनी युधिष्ठिराला वर्णिलेल्या त्या आख्यानात नल व त्याचा धाकटा भाऊ पुष्कर ह्यांच्यामध्ये द्यूत घडते. त्या द्यूतात नल सर्वस्व हरून देशोधडीस लागल्यानंतरची गोष्ट आहे. ऋतुपर्ण नावाच्या राजाकडे बाहुक ह्या नावाने नल सारथी म्हणून नोकरी करत होता. एकदा बाहुक ऋतुपर्णाला कोठे तरी

अनुक्रमणिका

घेऊन जात असताना त्यांचा रथ बेहड्याच्या एका झाडाजवळून जात होता. त्या झाडाकडे पाहून ऋतुपर्णाने बाहुकाला, त्या झाडावर किती पाने व फळे आहेत, तसेच जमिनीवर किती पाने व फळे पडली आहेत, त्या झाडांच्या दोन विशिष्ट फांद्यावर किती फळे आहेत. वगैरे गोष्टींचे मोठाले आकडे भराभर सांगितले. ऋतुपर्णाच्या आकड्यांवर विश्वास न बसून बाहुकाने रथ थांबवला, ऋतुपर्णाने दाखवलेल्या दोन फांद्या कापून खाली पाडल्या, आणि त्यांवर किती फळे आहेत ते मोजून पाहिले. तो आकडा, ऋतुपर्णाने सांगितल्याप्रमाणे, खरोखरच दोन हजार एकशे पंचाण्णव निघाल्यावर स्तंभित झालेल्या बाहुकाला, त्या गणनाकौशल्यामागची अक्षहृदय नावाची विद्या ऋतुपर्णाने त्या वेळी शिकवली आहे. अक्षहृदय विद्या अवगत झाल्यावर नलाने पुष्कराला द्यूताचे आह्वान देऊन त्यात त्याला हरवले आणि द्यूतात मागे गेलेले स्वतःचे राज्य परत मिळवले.

अक्षहृदय ही एक कविकल्पना आहे की तसली काही विद्या एके काळी खरोखर अस्तित्वात होती, हा प्रश्न वेगळ्या प्रकारचा आहे. त्याला प्रत्येकाने स्वतःचे उत्तर स्वतःच ठरवायचे आहे. आमच्या मते ती कविकल्पना आहे.

* * *

## टिपणे

१. कौरव-पांडवांमध्ये द्यूत व अनुद्यूत (बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास हा पण लावून पुन्हा एकदा खेळण्यात आले ते द्यूत) घडले तो प्रसंग महाभारतामध्ये सभापर्वाच्या उत्तरार्धात वर्णिला असून त्याचा सामान्यतः 'द्यूताचा प्रसंग' असा उल्लेख केला जातो. तथापि, त्या प्रसंगी कौरव-पांडवांमध्ये जेव्हा प्रथम द्यूत घडले त्या प्रसंगालाही 'द्यूताचा प्रसंग' म्हणण्याची प्रथा आहे. 'द्यूताचा प्रसंग' ह्या शब्दांच्या ह्या दोन अर्थांपैकी कोठला अर्थ विवक्षित आहे, ते संदर्भावरून ठरवायचे असते.

२. ह्या प्रकाराचा उत्तम नमुना म्हणून आदि व सभा ह्या दोन पर्वांच्या मराठी भाषांतराला भालबा केळकरांनी लिहिलेली प्रस्तावना वाचण्यासारखी आहे. पाहा: केळकर (१९८६; खंड १,पृ. ३०-१).

३. द्यूताचा प्रसंग लक्षपूर्वक वाचल्यास असे जाणवते की, आपल्याला उपलब्ध असलेल्या संहितेत बऱ्याच विसंगती आहेत. त्या विसंगतींचे स्वरूप व त्यांची कारणे ह्यावर तज्ज्ञांनी अनेक लेख लिहिले आहेत. उदाहरणार्थ : मेहेंदळे (१९९०; पृ. ४९-७५). त्या विसंगतींची चर्चा हा प्रस्तुत लेखाचा उद्देश नाही. प्रस्तुत लेख, द्यूताच्या आपल्या सर्वांना परिचित असलेल्या रूपरेषेवर आधारला आहे.

४. प्रस्तुत लेखात विवेचिलेले अनेक प्रसंग – कमी - अधिक प्रमाणात – इतरत्रही विवेचिले गेले आहेत. तसेच, द्यूतात घडलेल्या गोष्टींसंबंधीच्या युधिष्ठिराच्या उत्तरदायित्वाविषयी येथे मांडलेले विचार – काही प्रमाणात तरी – इतरत्रही मांडले गेले आहेत. (तपशिलांसाठी लेखाच्या उत्तरार्धाला जोडलेले (दुसरे) परिशिष्ट पाहा). तथापि, द्यूतात घडलेल्या घटनांचा हा पदर इतरत्र कोठे सुसंगत रीतीने मांडला गेलेला नाही. तसेच, व्यासांनी त्या प्रसंगांमध्ये गुंफलेले नाट्य व मनुष्यस्वभाव ह्यांची येथे घेतलेली यथायोग्य दखल नवीन असून, द्यूतात घडलेल्या गोष्टींकडे पांडवपक्षातल्या प्रमुख कथापात्रांनी कथेत पुढे ज्या प्रकारे पाहिले आहे, त्यातल्या खाचाखोचांचे येथे केलेले विवेचनही नवीन आहे.

५. पाहा : (२.६०.४, ५). 'द्यूतमदेन मत्तः' ह्यांचे बाळिंबे (१९८२-६; खंड २, पृ. १९५) ह्यांनी केलेले भाषांतर आहे – द्यूतमदाने बेफाम झालेला.

६. द्यूतातल्या पहिल्या डावात युधिष्ठिराने एक (बहुधा, त्याच्या स्वतःच्या गळ्यातला) बहुमोल सुवर्णखचित मोत्याचा हार पणाला लावल्यावर दुर्योधनाने त्या मोत्यांच्या तोडीचे दुसरे मोती प्रतिपाण (त्याच्या बाजूने पणाला लावलेले धन) म्हणून लावले होते. त्यानंतरच्या अठरा डावांमध्ये दुर्योधनाचा प्रतिपाण काय होता ते संहितेवरून स्पष्ट होत नाही. विसाव्या डावात दुर्योधनाचा प्रतिपाण म्हणून दुर्योधनाच्या वतीने शकुनीने, (एकोणिसाव्या डावात त्याने जिंकलेल्या) खुद्द युधिष्ठिराला पणाला लावले होते. अधिक माहितीसाठी लेखास जोडलेले (पहिले) परिशिष्ट पाहा.








७. द्यूतात युधिष्ठिराने लावलेल्या पणांकडे लक्षपूर्वक पाहिल्यास त्यांत अनेक विसंगती दिसतात. उदाहरणार्थ, युधिष्ठिराला देविका नावाची एक पत्नी असल्याचा महाभारतात उल्लेख आहे (१.९०.८३). त्याने द्रौपदीला पणाला लावले तसे देविकेला का लावले नाही? तसेच, त्याने चौदाव्या डावात पांडव राजपुत्रांच्या अंगावरचे अलंकार पणाला लावले असून, पुढच्या चार पणांमध्ये स्वतःच्या चार भावांना पणाला लावले आहे. त्याने द्यूतात कोठल्याच पांडव राजपुत्राला पणाला लावलेले नाही, हे कसे? अधिक विसंगतींसाठी पाहा : मेहेंदळे (१९९०; पृ.६५-८).ह्या साऱ्या विसंगतींवरून आम्ही काढलेला निष्कर्ष असा : तो प्रसंग – निदान त्यातला फार मोठा भाग – प्रत्यक्षात घडलेला नसून अनेक लोकांकडून रचला गेला आहे; परिणामतः, त्यात विसंगती निर्माण झाल्या आहेत.

८. नीलकंठ नावाच्या एका मराठी ब्राह्मणाने सतराव्या शतकात लिहिलेली भारतभावदीप नावाची महाभारतावरची टीका सुप्रसिद्ध आहे. महाराष्ट्रात महाभारताचा नीलकंठी पाठ – ज्या पाठावर नीलकंठाने त्याची टीका लिहिली आहे तो पाठ – प्रचलित आहे. नीलकंठाच्या मते, युधिष्ठिर दास झाला असल्याने त्याने शकुनीच्या आज्ञेनुसार द्रौपदीला पणाला लावले आहे. तसेच पाहा : Brokington (2009; pp. 26-7).

९. पाहा : (२.६२.२६, ६३.९).

१०. पाहा : 'दासीषु कामश्च यथोपजोषम्' – दासींचा मनास येईल तसा उपभोग घ्यायचा असतो – हे दुःशासनाचे शब्द; (२.६०.२७). 'दासीभावेन भोक्तुं मामीषुस्ते' – त्यांनी (कौरवांनी) माझा दासी म्हणून उपभोग घेण्याची इच्छा केली – हे द्रौपदीचे शब्द; (३.१३.५६). नल व त्याचा भाऊ पुष्कर ह्यांच्यामधल्या दुसऱ्या द्यूतात नलाने दमयंतीसकट सर्वस्व पणाला लावले तेव्हाचे दमयंतीविषयी अभिलाषा व्यक्त करणारे पुष्कराचे शब्द; (३.७७.१३-५). 'दासीभोगेन कृष्णां च भोक्तुकामाः सुतास्तव' – दासी म्हणून तुझ्या पुत्रांनी कृष्णेचा (द्रौपदीचा) उपभोग घेण्याची इच्छा केली – हे संजयाचे शब्द; (७.१०७.१३). किमनेन चिरं वीर नयस्व द्रुपदात्मजाम्। दासीभावेन भुङ्क्ष्व त्वं यथेष्टं कुरु मानद।। – वीरा, वेळ कशाला लावतोस. द्रौपदीला (आत) घेऊन जा आणि दासी म्हणून तिचा तू यथेष्ट उपभोग घे – हें, संशोधित आवृत्तीमधल्या (२.६३.२१) ह्या श्लोकानंतर दाक्षिणात्य पाठात दुःशासनाला उद्देशून असलेले कर्णाचे शब्द. त्या पाठानुसार, कर्णाचे म्हणणे ऐकून दुःशासन द्रौपदीला खेचून आत घेऊन जायला लागतो; आणि द्रौपदी मग भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र व विदुर ह्यांचीच नाहीत तर गांधारी आणि कुंती ह्यांचीही नावे घेऊन 'मला वाचवा' असा टाहो फोडते.पाहाः Sukthanka V.S., et.al. (1933-66; vol. 2, 439-40).

११. ह्या श्लोकातील 'समाहूत' ह्या शब्दामागे – आणि लेखात पुढे आलेल्या 'आहूत', 'आहूय', 'समाह्वान' वगैरे शब्दांमागे – 'आह्वे' हा धातू आहे. त्या धातूला 'आमंत्रण देणे' आणि 'आह्वान देणे' हे दोन्ही अर्थ आहेत. पाहा : Monier-Williams (1997); Apte (1998). द्यूताच्या व अनुद्यूताच्या संदर्भात त्या शब्दांचे विविध भाषांतरकारांनी लावलेले अर्थ पाहता असे दिसते की, त्या दोन अर्थांपैकी कोठला अर्थ घ्यायचा ते काहीसे आपल्या दृष्टिकोणावर अवलंबून आहे. संहितेकडे पाहता असे दिसते की, कौरवपक्षातल्या कथापात्रांच्या तोंडी त्या शब्दांना सामान्यतः आमंत्रण ही छटा असते, आणि पांडवपक्षातल्या कथापात्रांच्या तोंडी त्यांना सामान्यतः आह्वान ही छटा असते. तसेच, वरील श्लोकातल्या 'निर्वर्तितुम्' ह्या शब्दामागल्या 'निवृत्' ह्या धातूलाही प्रस्तुत संदर्भात दोन अर्थ संभवतात : नाही म्हणणे, माघार घेणे. त्यांतला संदर्भास योग्य वाटणारा अर्थ घ्यायचा असतो.

१२. वारणावताला जाताना युधिष्ठिराने दिलेले कारण असे : पिता म्हणेल ते करायचे असे आमचे व्रत आहे; पाहा : (१.१३३.१४).

१३. युधिष्ठिराचे हे व्रत कथेच्या वास्तवात त्याने खरोखर घेतले होते असे मानून प्रस्तुत लेख लिहिला आहे.

अनुक्रमणिका






तथापि, ते व्रत संहितेत मागाहून घालण्यात आले आहे असे आमचे मत असून, आमचे ते मत लेखाच्या उत्तरार्धातल्या १२ व्या टिपणात सकारण मांडले आहे.

१४. संहितेत ही गोष्ट येण्याची योग्य जागा सभापर्वातले राजसूयाचे वर्णन संपल्यावर होती. तथापि सभापर्वात असले काही नाही. येथे उद्धृत केलेली गोष्ट संहितेत फार पुढे – स्त्रीपर्वात – आली आहे. पाहा : (११.४.१५-३८; विशेषतः, ३२-३). कथेत फार पुढे येणाऱ्या अशा गोष्टी सामान्यतः मागाहून घातलेल्या असतात. तथापि, युधिष्ठिराला व्यास व नारद ह्या दोघांकडून कळलेल्या दैवी स्तरावरच्या गोष्टी कथेचा भाग आहेत, असे धरून प्रस्तुत लेख लिहिला आहे.

राजसूय यज्ञ संपल्यानंतर व्यास युधिष्ठिराला सांगतात की, तुला निमित्त करून कालाकडून आजपासून तेरा वर्षांनी क्षत्रिय समाजाचा संहार होईल; आणि ते ऐकून युधिष्ठिर, 'आजपासून मी कोणाचेही मन मोडणार नाही' अशी प्रतिज्ञा करतो, हे सारे महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या नीलकंठी पाठात असले, तरी ते प्रक्षिप्त आहे. पाहा: Sukthankar V.S., et.al.,(1933-66; vol. 2, 432-4).

१५. व्रत हे युधिष्ठिराने दिलेले कारण फक्त तो शकुनीशी का खेळला त्यापुरते होते, असे मानता येते. तथापि, युधिष्ठिर द्यूत खेळायला का गेला त्याचे वैशंपायनांनी जनमेजयाला सांगितलेले कारण पाहता आम्हाला युधिष्ठिर त्याचे व्रत हे कारण, तो द्यूत व अनुद्यूत खेळायला का गेला त्याविषयीही देताना दिसतो.

१६. 'निकृति' ह्या शब्दाचा शब्दकोशांमध्ये दिला जाणारा अर्थ आहे – कपट, लबाडी. तथापि, प्रसंगास अनुरूप असल्यास, द्यूताच्या संदर्भात त्या शब्दाचा अर्थ 'द्यूत खेळण्यातले कौशल्य' असाही करायला हवा, ह्या मतासाठी पाहा : मेहेंदळे (१९९०; पृ. ४५-७).

१७. वरील श्लोकातल्या 'ह्रिया' – लज्जेने – ह्याचे नीलकंठांने दिलेले स्पष्टीकरण असे : कार्पण्यदोषा-न्निवृत्त इति लज्जया – घाबरून मागे हटला ह्या लाजेने. तसेच पाहा : वाळिंबे (१९८२-६; खंड २, पृ. २२४).

१८. द्रौपदीच्या प्रश्नावर अनेक ठिकाणी चर्चा आहे. उदाहरणार्थ : Brokington (2009), Hiltebeitel (2001; pp. 240-77), Mehandale (2001; pp. 421-36), मेहेंदळे (२००१; पृ. ६५-८३).

द्यूत व त्यानंतर कुरुसंसदेत घडलेल्या गोष्टी ह्यांच्या वाचनीय आढाव्यासाठी पाहा : Chaitanya (1985; pp. 170-87).

१९. आपल्याला उपलब्ध असलेल्या संहितेत युधिष्ठिराच्या तोंडी हे शब्द कोठेही नाहीत. विसाव्या डावात युधिष्ठिराने द्रौपदीला पणाला लावल्यावर शकुनी 'जितम्' – मी जिंकलो – म्हणाला हे संहितेत आहे; (२.५८.४३). त्यानंतर युधिष्ठिर 'जितोऽस्मि' म्हणाला असणार असे धरून घ्यावे लागते. वेगळ्या विचारासाठी पाहा : मेहेंदळे (१९९०; पृ. ६४).

२०. द्रौपदीच्या प्रश्नाला ह्याच प्रकारचे उत्तर भीष्मांनी त्या प्रसंगी पुढे पुन्हा एकदा दिले असून तेथे त्यांनी म्हटले आहे की, त्या प्रश्नाचे उत्तर युधिष्ठिराने स्वतःच द्यावे. पाहा : (२.६२.१४-२१). त्यावर युधिष्ठिर मूग गिळून बसला आहे.

२१. युधिष्ठिराने द्रौपदीला पणाला लावले म्हणूनच पुढच्या गोष्टी घडू शकल्या, ह्याविषयी काही न म्हणता भीष्मांना अनेकांनी दोष दिला आहे. उदाहरणार्थ : कृष्ण (५.२९.३१); कर्वे (१९७६; पृ. २६-७), मेहेंदळे (२००१; पृ. ८१-२). वेगळ्या मतासाठी पाहा : Chaitanya (1985; p. 178 ff.).

२२. द्रौपदीच्या प्रश्नावर कुरुसंसदेत त्या प्रसंगी पुढे फक्त दोन व्यक्तींनी त्यांची मते दिली आहेत : एक आहे विकर्ण नावाचा दुर्योधनाचा एक धाकटा भाऊ, आणि दुसरा आहे कर्ण. विकर्ण व कर्ण ह्या दोघांनीही द्रौपदीचा प्रश्न भीष्मांसारखाच व्यापक अर्थाने घेतला आहे. विकर्णाच्या मते द्रौपदी जिंकली गेलेली नाही. विकर्णाने त्याचे ते मत संसदेसमोर सकारण मांडले आहे. कर्ण विकर्णानंतर बोलला आहे. त्याने विकर्णाचे

सर्व मुद्दे खोडून काढले असून द्रौपदी उघडच जिंकली गेली आहे, हे आपले मत संसदेसमोर मांडले आहे. द्रौपदीने तिचा प्रश्न कुरुसंसदेत पुनःपुनः विचारूनही तिच्या बाजूने कोणी का बोलत नव्हते, त्याचे कर्णाने विकर्णाला दिलेले कारण असे : त्या सर्वांना द्रौपदी धर्माने जिंकली गेल्याचे दिसते आहे. पाहा : (२.६१.२८).

२३. उदाहरण म्हणून त्याच्या तोंडचे पुढील उद्‌गार पाहा : न मे वागनृतं प्राह नाधर्मे धीयते मतिः।। १.१८७.२९, १.१८८.१३ – माझी वाणी असत्य वदत नसते आणि माझी मती अधर्माकडे वळत नसते.

२४. द्रौपदीने भीष्मांना दिलेले उत्तर आणि द्रौपदीला एका अटीवर दास्यमुक्त करण्याचे दुर्योधनाचे आश्वासन, ह्या दोन घटनांच्या दरम्यान कथेत दुसऱ्या अनेक महत्त्वाच्या घटना घडल्या आहेत. उदाहरणार्थ, द्रौपदीवस्त्रहरण व दुःशासनाचे रक्त पिण्याची भीमाची प्रतिज्ञा; दुर्योधन द्रौपदीला त्याची डावी मांडी दाखवतो, व ती मांडी मी युद्धात गदेने फोडीन अशी भीम प्रतिज्ञा करतो तो प्रसंग. तथापि, त्या घटना येथे प्रस्तुत नसल्याने त्यांविषयी येथे काही दिलेले नाही.

२५. दुर्योधनाच्या म्हणण्यावर भीम व अर्जुन बोलले असले तरी, त्यांनी टोलवाटोलवीची उत्तरे दिली आहेत. पाहा : (२.६२.२४-३७; ६३.९, २१). वेगळ्या विचारासाठी लेखाच्या उत्तरार्धास जोडलेल्या (दुसऱ्या) परिशिष्टामधले मेहेंदळ्यांचे मत पाहा.

२६. कौरव व पांडव हे सारेच भरताचे वंशज असल्याने त्या सर्वांनाच भारत असे संबोधता येते.

२७. पाहा : Brockington (2009; p. 29).

२८. पाहा : (२.६२.६).

२९. द्रौपदीच्या तोंडी असाच धिक्कार कथेत पुढे दोनदा आहे : प्रस्तुत प्रसंगी थोडे पुढे, आणि उद्योगपर्वात कृष्ण शिष्टाईसाठी कौरवांकडे जायला निघतो तेव्हा. पाहा : (३.१३.७०), (५.८०.३१).

३०. पाहा : (५.१३५.११-२१), (१५.२३.९-१४).

३१. येथे घेतलेला अर्थ गांगुलींच्या भाषांतराला धरून आहे. पाहा : Ganguli (1990; vol. 2, Vana Parva, p. 63).

३२. युधिष्ठिराला तिने प्रस्तुत प्रसंगी इतरत्रही जुगारी म्हटले आहे. पाहा : (४.१५.३५, १८.२३, १९.१). युधिष्ठिराला कितव – जुगारी – म्हटले असल्याचे संहितेतले दुसरे उल्लेख : विदुर (२.६३.१८); संजय (७.२०.४६). विकर्णालाही युधिष्ठिर जुगारी दिसला आहे. पाहा : (२.६१.२०-२५).

३३. प्रस्तुत परिशिष्टातली माहिती मेहेंदळे (१९९०) ह्या पुस्तकावर आधारली असून त्या पुस्तकात कौरव-पांडवांमधल्या द्यूताविषयी अधिक माहिती आहे.

३४. ऋग्वेदकालीही द्यूत खेळले जात असे. ऋग्वेदात एका जुगाऱ्याच्या तोंडचे – अक्षसूक्त (१०.३४) नावाचे – एक सूक्तच आहे. तथापि, हारजीत ठरवण्याची त्या काळची पद्धत वेगळी होती. अधिक माहितीसाठी पाहा : मेहेंदळे (१९९०).



# जागतिकीकरण

प्रा. अशोक कृष्णाजी जोशी

जागतिकीकरणाची व्याप्ती व व्यापक अर्थ हळूहळू स्पष्ट होत आहे. औद्योगिक क्रांती जशी क्रांती होती, राष्ट्रवादाचा उदय ही जशी सर्वव्यापी क्रांती ठरली, तसेच जागतिकीकरणाचे होत आहे. जागतिकीकरण ही केवळ आर्थिक व सांस्कृतिक जगतापुरती मर्यादित घटना नाही; तर ती सर्वजीवनव्यापी घटना आहे. माणसाच्या वेगळ्याच जीवनशैलीशी, मानसिकतेशी जागतिकीकरण निगडित आहे हे लक्षात आले की, त्याची सर्वव्यापकता लक्षात येते.

औद्योगिक क्रांतीपूर्वीच्या सामंतशाहीयुगात स्वामिनिष्ठा हे महत्त्वाचे मूल्य मानले गेले. औद्योगिक क्रांतीनंतर व्यक्तिविकास व व्यक्तिस्वातंत्र्य या मूल्यांना महत्त्व प्राप्त झाले. व्यक्तिविकास व व्यक्तिस्वातंत्र्य या मूल्यांना जागतिकीकरण चालना देतेच, पण त्याचबरोबर राष्ट्रवादी विचारसरणीने देशादेशात ज्या भिंती उभ्या केल्या आहेत, त्या प्रथम आर्थिक क्षेत्रात व तंत्रविद्याक्षेत्रात तोडायचे काम नव्या जागतिक अर्थव्यवस्थेत जोमाने सुरू झाले आहे.

जागतिकीकरणाचा अर्थ लावण्याचे, समजून घेण्याचे काम काही जाणत्या व बुद्धिमान लोकांनी सुरू केले आहे. जागतिकीकरणाला आंधळा विरोध करून त्याची अटळता स्वीकारायची व जागतिकीकरणाचे फायदेही मिळवायचे हा दुटप्पी खेळ खेळण्यापेक्षा जागतिकीकरणाचे दुष्परिणाम कमीत कमी कसे होतील, जागतिकीकरणाच्या प्रक्रियेमध्ये ज्या व्यक्तींवर, घटकांवर अन्याय होईल त्यांना कोठल्या प्रकारची मदत करणे व्यवस्थेला शक्य आहे, हा विचार करणे. त्या प्रकारचा विचार पुढे मांडणे हे बुद्धिमान लोकांचे कर्तव्य आहे. जागतिकीकरणाच्या लाटेला सामोरे जाण्याचा तो एक सन्मान्य मार्ग असू शकतो.

हे २१ वे शतक जागतिकीकरणाचे, सुधारलेल्या आंतरराष्ट्रीय संबंधांचे, आंतरराष्ट्रीय व्यापाराचे, दळणवळणक्रांतीचे, कम्प्युटर व आंतरजाल क्रांतीचे सर्व क्षेत्रांतल्या नव्या शोधांचे शतक म्हणून गणले जाईल, याची आताच चाहूल लागली आहे.

थॉमस फ्रीडमन (Thomas Friedman) या विचारवंताने आपल्या द वर्ल्ड इज फ्लॅट (The World is Flat) या आपल्या पुस्तकात जागतिकीकरणाच्या बऱ्याच पैलूंचा विचार केला आहे. त्याचे (The World is Flat) हे पुस्तक समोर ठेवून व जागतिकीकरणाविषयीचे माझी मते मांडून हा लेख लिहिला आहे.

विसाव्या शतकाच्या अखेरीस ऐंशीच्यादशकात जगाची साम्यवादी जग व लोकशाही मानणारे जग अशी झालेली विभागणी संपली. हा जो क्रांतिकारी बदल झाला त्याचा प्रत्यक्ष परिणाम भारतावर ९०च्या दशकात झाला. मुक्त बाजारव्यवस्था, जागतिकीकरण, उदारीकरण यांचे जोरदार वारे भारतात वाहू लागले. आंतरजालाचा (Internet) प्रसार व कम्प्युटरक्रांती घडू लागली. शिक्षणव्यवस्थेत कम्प्युटरला महत्त्व मिळून तरुण पिढी मोठ्या प्रमाणात संगणक शिकू लागली. एवढ्यात सर्वच जगात y2k हा प्रश्न समोर आला. हा प्रश्न निर्माण होण्याचे एक कारण होते कम्प्युटरमध्ये माहिती घालत असताना, कम्प्युटरला आपले प्रश्न सोडवायला देताना लवकरच २००० हे वर्ष येणार आहे व वर्षाचा आरंभ १९ ने न होता २० ने होणार आहे. (म्हणजे १९९९ न म्हणता आपल्याला २००१ असे भविष्यात म्हणावे लागेल), ही शक्यताच लक्षात घेतली गेली नव्हती व त्याप्रमाणे कम्प्युटरमध्ये व्यवस्था केली नव्हती. १९ च्या श्रेणीतले कोठलेही वर्ष कम्प्युटरवर आपोआप बदलले गेले तसे २० च्या श्रेणीतले जाईल का, हा गहन प्रश्न होता. तसे जर आपोआप झाले नाही तर २००० साली फार मोठा सार्वत्रिक गोंधळच होणार होता.

२००० साली कम्प्युटरवर काम करणाऱ्या सर्व प्रवासी कंपन्या, बँका, व्यापारी आस्थापने, हवाई वाहतूक

अनुक्रमणिका






यंत्रणा इत्यादी सर्वच आस्थापनांना या y2k प्रश्नाने पेचात पकडले होते. कम्प्युटरवर आधी घातलेली माहिती स्वतंत्रपणे संग्रहित करून जरूर पडल्यास २००० सालाच्या सुरुवातीपासून तिचा उपयोग करणे हाच त्यावर उपाय होता. यासाठी वेळ फारच थोडा होता. भारतात कम्प्युटर शिक्षित मनुष्यबळ व कम्प्युटर कंपन्या होत्या. माहितीजालाचाही भारतात प्रसार झाला होता. मग जगातल्या सर्वच आस्थापनानी चढे वेतन देऊन कम्प्युटरचे सर्वसामान्य ज्ञान व कम्प्युटरवर अचूकपणे माहिती भरवण्याची क्षमता हे दोन मुख्य निकष लावून नोकरभरती केली व भारतात एक मोठी क्रांती अवतरली. औद्योगिक क्रांतीनंतरची ही मोठी क्रांती होती. भरपूर काम, चढे वेतन, वेळेवर काम, कार्यनीती (Work ethics) या संकल्पनांना या क्रांतीत महत्त्व मिळाले. तरुण पिढीची सर्व जीवनशैलीच बदलली. काटकसरीच्या तत्त्वाला समोर ठेवणारा मध्यमवर्ग आपल्याच मुलांचा उपभोक्तावाद, सुखवाद, चंगळवाद पाहत होता. जीवनशैलीतला व अर्थव्यवस्थेतला हा बदल नजरेत भरण्यासारखा होता.

कम्प्युटरक्रांतीला दळणवळणक्रांतीची जोड होतीच. विसाव्या शतकाच्या ९०च्या दशकात सारी दूरध्वनी यंत्रणाच साऱ्या जगात अधिक सक्षम झाली. त्याला मदत म्हणून इंटरनेट किंवा आंतरमहाजालाचा उदय याच दशकात झाला. भारतात इंटरनेटला किंवा आंतरमहाजालाचा उदय १९९५ नंतरच झाला.

इंटरनेटच्या प्रसारासाठी व मुख्यतः व्यापारवृद्धीसाठी अमेरिकेने ऑप्टिक फायबर केबलचे (optic fibre cable) जाळे ९०च्या दशकात जगातील समुद्राखालून मोठाच खर्च करून घातले. व्यापारवृद्धीसाठी त्याचा उपयोग होईल व मोठा फायदा होईल. असा अंदाज त्यामागे होता. पण तसे काही झाले नाही. पण त्याच वेळी भारतात उदयास आलेल्या कम्प्युटर कंपन्यांना व विशेषतः y2k प्रश्न सोडवण्यासाठी सर्वच कंपन्यांना त्या optical fibre network चा दळणवळणासाठी, टेलीफोन संभाषणवहनासाठी जवळजवळ फुकटात किंवा अगदी नाममात्र शुल्काने उपयोग झाला व एका मोठ्या आर्थिक क्रांतीचा पाया रचला गेला. परस्परांशी दूरध्वनीवर विचार-विनिमय करणे, बोलणे, सर्व प्रकारची माहिती दृश्य स्वरूपात पाठवणे शक्य झाले. या आंतरजालामुळे भारत व अमेरिका, भारत व इतर जग यातले अंतर एकदम कमी होऊन संपर्क साधणे व दळणवळण करणे अगदी सहजसुलभ झाले. y2k प्रश्नाकरिता भारतीय कंपन्यांनी याचा मोठा उपयोग करून घेतला. आर्थिक जगात एक मोठी क्रांतीच घडली.

या क्रांतीमुळे भारतीय अर्थव्यवस्थेत जसे मोठे बदल झाले, तसाच भारतीय तरुणांच्या मानसिकतेतही मोठा बदल झाला. शैक्षणिक पात्रता मिळवणे, जास्त कष्ट करणे, कामाकरिता जास्त वेळ देणे, कार्यशैलीच बदलणे, जास्त कमावून जास्त खर्च करणे, नव्या नव्या वस्तू घेणे व एकूणच जीवनशैली अधिक श्रीमंत कशी होईल हे पाहणे, हा नवा भारतीय तरुणवर्ग करू लागला. आजवर पारंपरिकतेने जोपासलेल्या काटकसरीच्या सवयींना व प्युरिटॅनिझमला (puritanism) विसरणारी ही जीवनशैली होती. तीमध्ये समाजवादी व साम्यवादी व नेहरूवादी विचारांना स्थान नव्हते. श्रमजीवी, शोषित व कष्टकरी तीमध्ये केंद्रभागी नव्हते. सर्व समाजाचे कल्याण हा विचार त्यामध्ये नव्हता; तर व्यक्तिविकास व व्यक्तीच्या प्रगतीवर आधारलेली ही विचारसरणी होती. सामाजिक कल्याण आपाततः घडले तर या अर्थ-व्यवस्थेला ते हवे होते; पण तो या अर्थव्यवस्थेचा उद्देश नव्हता. फायद्यावर आधारलेली ही अर्थव्यवस्था y2k प्रश्नाबरोबरच उदयास आली, हे लक्षात घेण्यासारखे आहे.

y2k प्रश्न २००० साली संपला. तो फार गंभीर प्रश्न नव्हता, हे प्रश्न संपल्यावर सर्वांच्याच लक्षात आले. पण २००० सालापूर्वी सर्व आस्थापनांतच प्रचंड धाकधूक होती, हे खरे आहे.

y2k बरोबरच नव्या रीतीने कम्प्युटरवरच व्यापार करायचा, मालाची निवड खरेदी, विक्री करायची हे स्वप्न दाखवणारी डॉट.कॉम (dot.com) पद्धती उदयास आली व ती न रुळल्याने डॉट.कॉम (dot.com) क्रांती असफल झाली.

y2k क्रांती घडणे dot.com क्रांती असफल होणे याचा तात्कालिक परिणाम सर्व अर्थव्यवस्थेवर झाला. पण २००३ पासून कम्प्युटरक्षेत्रात नवी नोकरभरती सुरू

होऊन सर्व अर्थव्यवस्थांना विशेष जोर आला.

याच काळात कम्प्युटरक्षेत्रात out sourcing सुरू झाले. उदाहरण म्हणून इथली कॉल सेंटर्स घ्या. या कॉल सेंटर्समध्ये बऱ्याच परदेशी कंपन्यांचे काम केले जाते. त्यांच्या ग्राहकांशी फोनवर बोलले जाते व ब-याचदा ते त्यांच्या उच्चारणपद्धतीनुसार बोलले जाते. वास्तविक हे काम त्या त्या कंपन्यांनी करायचे आहे. पण स्वस्तात व अधिक कार्यक्षमतेने ते व्हावे म्हणून आवश्यक ती सर्व माहिती देऊन या परदेशस्थित कॉल सेंटर्सकडून हे काम केले जाते. भारत व चीनसारख्या मोठ्या देशांत कम्प्युटरशिक्षित मोठे मनुष्यबळ उपलब्ध आहे. त्या देशातल्या कम्प्युटर कंपन्या व कॉल सेंटर्स ही आऊटसोर्सिंगची कामे योग्य करार करून योग्य रीतीने करून देतात. परदेशी कंपन्या आपले मोठे मोठे (projects) प्रोजेक्ट्स् नाव असलेल्या भारतीय व चिनी कंपन्यांकडून करून घेतात. असे प्रोजेक्ट्स् मिळवण्यासाठी या एतद्देशीय कंपन्यांत स्पर्धा असते.

या कंपन्यांत काम करणाऱ्यांना अधिक पगार मिळत होता. त्यामुळे भारतीय लोकांच्या सवयी बदलल्या. अधिक मोठी व फॅशनेबल घरे, तऱ्हेतऱ्हेच्या वस्तू, हॉटेलमध्ये तऱ्हेतऱ्हेचे खाद्यपदार्थ इत्यादी गोष्टी केवळ १०-१२ वर्षांत लोकांच्या अंगवळणी पडल्या.

असा बदल जरी १२-१५ टक्के लोकांच्या जीवनात झाला, तरी त्याचा अपरिहार्य परिणाम सर्व समाजावर झाला. दारिद्र्यात राहणारी बहुसंख्य जनता व १२-१५ टक्के संपन्न लोक असा विरोधाभास समाजात तयार झाला, तरी या वरच्या वर्गात यायला लोकशाही तत्त्वानुसार सर्वांना खुला प्रवेश होता. त्याचा फायदा काही जणांना मिळाला, तर उरलेल्या दारिद्र्यात जीवन कंठणाऱ्या बहुसंख्य समाजापुढे संपन्न बनण्याचे स्वप्न कम्प्युटर क्रांतीने उभे केले.

या घटिताचा अमेरिकन बाजूने अर्थ लावण्याचे काम थॉमस फ्रीडमन (Thomas Friedman) या लेखकाने द वर्ल्ड इज फ्लॅट (The World is Flat) या पुस्तकात केले आहे. जागतिकीकरण कसे कसे घडत गेले याची अभ्यासपूर्ण, मनोरंजक, पण सविस्तर चर्चा या पुस्तकात आहे.

याउलट भारत व इतर विकसनशील देशांतले देशीवादी लेखक (Nativist) जागतिकीकरण विरोधी भूमिका घेऊन स्थानिक संस्कृती व हे जागतिकीकरण यांत एक अटळ संघर्ष आहे व जागतिकीकरणाचा विपरीत परिणाम स्थानिक संस्कृति वैशिष्ट्यांवर होत आहे व होणार आहे, अशी भूमिका घेतात.

या दोन्ही भूमिकांचा आपण या लेखात साधक-बाधक व सविस्तर विचार करणार आहोत.

अर्थव्यवस्था, संस्कृती व एकूणच मानवी जीवनशैली एका राष्ट्रापुरती, एका भौगोलिक प्रदेशापुरती न राहता तिचे सार्वत्रिकीकरण, भूमंडळीकरण होणे होय. जागतिकीकरणाची तीन प्रमुख वैशिष्ट्ये मानता येतील.

सर्वांसाठी समानतेवर आधारलेली अर्थव्यवस्था वंश, वर्ण, लिंग, जाती हे भेदाभेद नष्ट करून ही अर्थव्यवस्था एक प्रकारे समानतेवर आधारलेले क्रीडांगणच झाले आहे, हे जागतिकीकरणाचे एक प्रमुख वैशिष्ट्य आहे. विशिष्ट नैपुण्य (skill) मिळविलेला माणूस वंश, वर्ण, जाती, लिंग, राष्ट्रीयत्व यांचा विचार न करता जागतिकीकरणाच्या या अर्थव्यवस्थेत स्थान मिळवतो. या अर्थव्यवस्थेचे उद्दिष्ट नफा हेच असल्याने बाकी सगळे घटक दुय्यम महत्त्वाचे ठरतात. स्पर्धेवर आधारलेल्या या अर्थव्यवस्थेत बाजाराचे नियमच लागू होतात व कोणताही माणूस स्पर्धेमध्ये भाग घेऊन या अर्थव्यवस्थेचा भाग बनतो.

या अर्थव्यवस्थेत स्पर्धा असतेच, पण त्याचबरोबर सहकार्य (Collaboration) महत्त्वाचे असते. या व्यवस्थेत स्पर्धा करून एकटा माणूस विशेष काही करू शकत नाही. ही अर्थव्यवस्थाच व्यक्तिकेंद्रित नाही. गटाने, समूहाने एखादा प्रोजेक्ट किंवा एखादे काम हाती घेऊन ते व्यवस्थित व वेळेवर करायचे, त्यासाठी सहकार्य करायचे व कंपनीला जास्तीत जास्त नफा मिळवून द्यायचा, ही जागतिकीकरणातली अर्थनीती आहे.

उदाहरणार्थ, एखाद्या भारतीय माहिती तंत्रज्ञान कंपनीत (आय. टी. कंपनीत) सु. १०० एक इंजिनिअर्स एकाच प्रोजेक्टच्या लहानलहान भागांवर काम करीत असतात. आपआपली दिलेली कामे ते नीट करतात व वेळेवरही करतात. संपूर्ण प्रोजेक्ट (प्रकल्प) यशस्वी करण्यासाठी

ते सर्वजण झटत असले, तरी त्यांतल्या फारच थोड्या वरिष्ठांना संपूर्ण प्रकल्पाची कल्पना असते. त्यांचे काम स्पर्धात्मक असले तरी ही स्पर्धा इतरांशी नसते, तर स्वत:शीच असते. इतरांशी सहकार्य करूनच तो प्रकल्प यशस्वी होतो.

परस्परसहकार्य करणे, प्रकल्प पूर्ण करण्यासाठी इतर सहकाऱ्यांशी सहकार्य करणे हा नव्या जागतिक अर्थव्यवस्थेचा दुसरा विशेष आहे. त्यापूर्वीची अर्थव्यवस्था बऱ्याच प्रमाणात व्यक्तिकेंद्रित होती. त्यात दुसऱ्या सहकाऱ्यांशी स्पर्धा करून, त्यांना मागे टाकून वरची जागा (पोस्ट) मिळवायची हा भाग फार महत्त्वाचा होता. या नव्या अर्थव्यवस्थेत एकटा माणूस काम करीत नाही; तर समूह, गट, ग्रुप काम करतो. ते काम वेळेवर व व्यवस्थित झाले पाहिजे ही समूहाची जबाबदारी असते, प्रत्येकाची जबाबदारी असते. दुसऱ्यावर कुरघोडी करून काम करायचे, यश मिळवायचे हे जुन्या अर्थव्यवस्थेतले तत्त्व या व्यवस्थेलाच मान्य नाही. एखाद्या प्रकल्पावर काम करणारा समूह तो प्रकल्प पूर्ण करीत असतो, यशस्वी करीत असतो.

आजच्या जागतिक अर्थकारणाचा तिसरा विशेष थॉमस फ्रीडमन या लेखकाने आपल्या द वर्ल्ड इज फ्लॅट (The World is Flat) या पुस्तकात सांगितला आहे; आजचे जग हे गोल राहिले नसून सपाट झाले आहे, त्यात जगाचा कोठलाही भाग अनोळखी राहिला नसून त्या भागात पोचणे, त्याच्याशी संपर्क राखणे सहज शक्य झाले आहे. जागतिकीकरणाचा फ्रीडमन हा भाष्यकार कोलंबस अमेरिकेत गेल्यापासून जागतिकीकरण सुरू झाले, प्रदेशांची Insularity संपली असे मानतो. तो जागतिकीकरणाचे तीन टप्पे मानतो. १. कोलंबसाचा अमेरिकेला पोचण्याचा काल, म्हणजे १४९२ ते औद्योगिकीकरण सुरू होण्याचा, इ.स. १८०० पर्यंतचा काळ, २. इ.स. १८०० ते इ.स. २००० हा दुसरा टप्पा, (या टप्प्यात औद्योगिक क्रांती, राष्ट्रवादाचा उदय, दोन महायुद्धे, अणुस्फोट, नंतरचे शीतयुद्ध, कम्प्युटरचा व इंटरनेटचा उदय व प्रसार, आउटसोर्सिंगची सुरुवात या प्रमुख घटना येतात, ३. इ.स. २००० नंतरचे जागतिकीकरणाचे युग. (या तिसऱ्या कालखंडात सारी अर्थव्यवस्था बदलली. कोठून तुम्ही काम करता हे महत्त्वाचे नाही, तर जग हे एक प्रकारचे खेडे झाले असून या नव्या अर्थकारणात आपण कोठेही राहून काम करू शकतो. असे फ्रीडमन म्हणतो.) सारे जग सपाट झाले असून राखीवता व संरक्षणवाद यांना नव्या अर्थव्यवस्थेत स्थान नाही, असे फ्रीडमन म्हणतो. विशिष्ट देशाचा नागरिक म्हणून या जागतिक अर्थव्यवस्थेत कोणालाही खास हक्क व संरक्षण किंवा राखीवता मिळत नाही. सगळे काही मागणी–पुरवठा–नफा हे घटक समोर ठेवून होत असल्याने कामाचा उरका, कार्यक्षमता, नैपुण्य हेच व्यक्तिगत घटक महत्त्वाचे ठरतात. सहकार्यावर आधारित काम असल्याने इतरांशी स्पर्धा असण्यापेक्षा आपल्या आधीच्या कामापेक्षा अधिक चांगले काम करून, अधिक चांगले परिणाम किंवा फल दाखवणे अशी स्वत:शीच स्पर्धा या अर्थव्यवस्थेत असते. नव्या अर्थव्यवस्थेत टिकून राहण्याचा तोच एक मार्ग आहे.

व्यवस्थेतला हा मोठा बदल इ.स. २००० च्या आसपास नेणीवपूर्वक पण ठळकपणे झाला. याच काळात जागतिक अर्थव्यवस्थेत मोठ्या प्रमाणावर आउटसोर्सिंग केले गेले. भारतीय कंपन्यांनी या स्पर्धात्मकतेचा व आउटसोर्सिंगचा फायदा उठवला. नोकरीचा शोध घेणाऱ्या तरुणांनाही मोठी संधी उपलब्ध झाली. नवे तंत्रज्ञान ते शिकले. नव्या तंत्रज्ञानाचा सार्वत्रिक वापर सुरू झाला. कामाचे नवे मानदंड तयार झाले. 'वर्क एथिक्स', नवी कार्यनीतीमाहिती तंत्रज्ञान क्षेत्रात स्थिरावली. कामातील श्रेणिव्यवस्था प्रत्यक्ष व्यवहारातून हद्दपार झाली. हा वरच्या श्रेणीचा, तो खालच्या श्रेणीचा, हा सीनिअर, तो ज्युनिअर असा भेद अर्थहीन झाला. एकमेकांना पहिल्या नावाने हाक मारून कामाच्या जागी समता वावरू लागली. चतुर्थ श्रेणी कर्मचारी हा प्रकारच संपला. सहकार्याचे वातावरण कामाच्या जागी निर्माण झाले.

नव्या युगाशी, नव्या तंत्रज्ञानाशी, नव्या उद्योगवातावरणाशी सुसंगत असे बदल उद्योगजगतात झालेच; पण समाजातही असे बदल व्हायला सुरुवात झाली. सरकार व उद्योगजगत यांमध्ये नवे संबंध प्रस्थापित होऊन वेगळे वातावरण व्हायची ही एक पायरी होती. सामाजिक, आर्थिक, उद्योगविषयक नवे नमुने, नवी

मानके निर्माण झाली. हा बदल केवळ संख्यात्मक नव्हता, तर गुणात्मकही होता. हे बदल फार वेगाने होत होते व सहज घडत होते.

इ.स. २००० च्या आसपास जागतिक अर्थव्यवस्थेत व भारत चीनसारख्या विकसनशील देशांत हा जो आर्थिक, शासकीय व तंत्राधिष्ठित बदल होत होता. त्याला काही मानके किंवा प्रमाणकेही होती. फ्रीडमन दहा प्रमाणके, किंवा दहा समतलता घडवणारे घटक–फ्लॅटनर्स–होते असे म्हणतो. फ्रीडमनचे हे म्हणणे विचार करण्यासारखे आहे.

समतलता निर्माण करणारा पहिला घटक म्हणून ११/९/१९८९ रोजी झालेला बर्लिनच्या भिंतीचा विध्वंस या घटनेचा फ्रीडमन उल्लेख करतो. दुसऱ्या महायुद्धानंतर पूर्व बर्लिन व पश्चिम बर्लिन असे बर्लिन शहराचे दोन भाग केले गेले होते. पश्चिम बर्लिनची शासनव्यवस्था लोकशाही स्वरूपाची होती व पश्चिम बर्लिनचे नागरिक समृद्धीचे जीवन जगत होते. पूर्व बर्लिन साम्यवादी शासन-व्यवस्थेखाली होते व तिथले नागरिक पश्चिम बर्लिनच्या तुलनेत हलाखीचे जीवन जगत होते. बर्लिनची दुसऱ्या महायुद्धानंतर झालेली ही विभागणी जर्मन नागरिकांना आवडत नव्हती. ते बर्लिनच्या दोन्ही भागांचे एकीकरण व्हावे, जर्मनीचे पूर्व व पश्चिम दोन्ही भाग एक व्हावेत या मताचे होते. पूर्व बर्लिनमधल्या अनेकांनी ती भिंत ओलांडण्याच्या प्रयत्नात आपले प्राण गमवले होते. पूर्व जर्मनीच्या सैन्याचा गोळीबार त्या लोकांनी अनुभवला होता.

साम्यवादी शासनाला ही एकीकरणाची ऊर्मी फार वेळ दाबून ठेवता आली नाही. ११ सप्टेंबर १९८९ ला स्वयंस्फूर्तीने लोकांनी ही विभागणी करणारी भिंतच पाडली. दोन्ही बर्लिनचे व दोन्ही जर्मनींचे एकीकरण होऊन लोकशाही शासनव्यवस्था तिथे प्रस्थापित झाली. मानवी इतिहासातला हा स्वातंत्र्याचा, मोकळेपणाचा काळ होता, असे अनेकांना वाटले.

याच वेळी नव्या विचारांचे वारे वाहू लागले. इंटरनेटचा उदय झाला. कम्प्युटर क्रांती झाली. ज्ञानक्षेत्रात व माहिती-क्षेत्रात मोठी क्रांती झाली. नवे माहितीयुग अवतरले. त्या वेळी हे जे काही घडले. त्याची तुलना गोल्ड रशबरोबर केली जाते. मानवी इतिहास व मानवी जीवनशैली बदलण्याचे सामर्थ्य या कम्प्युटर क्रांतीत, इंटरनेट क्रांतीत, माहिती तंत्रज्ञानक्रांतीत होते. या क्रांत्यांनी घडविलेला मानवी विकास अभूतपूर्वच होता.

विसाव्या शतकातल्या ९० च्या दशकातल्या या माहितीक्रांतीची काही प्रमुख वैशिष्ट्ये इथे नोंदणे आवश्यक वाटते. कम्प्युटरक्षेत्रात काही सॉफ्टवेअर गोपनीय असते व किंमत देऊनच विकत घेता येते. काही कम्प्युटर तज्ज्ञांनी ही काळजी घेतली की समाजा-करिता लागणारे, समाजाला उपयुक्त असणारे सॉफ्टवेअर मोफत मिळणे आवश्यक आहे. अशा प्रकारचे सॉफ्टवेअर तयार करणारा एक वर्गच तयार झाला. विकीपीडिया या वैशिष्ट्यपूर्ण ज्ञानकोशाचा/माहितीकोशाचा इथे उल्लेख करता येईल. खुला ज्ञानकोश ही संकल्पनाच माणसापुढची नवीन संकल्पना होती. आपल्याला माहीत असलेले आपण विकीपीडिआमध्ये घालायचे, त्यात आधीच असलेली माहिती संपादित करायची (त्या माहितीची अचूकता पाहण्याचे काम इतर लोक करतातच), अशा रीतीने विकीपीडिया ज्ञानकोशात नोंदी लिहिल्या जातात, त्यांची अचूकता पाहिली जाते, त्या संपादित केल्या जातात व हे सगळे स्वयंसेवकी वृत्तीने व पैशाचे कोठलेही आदान-प्रदान न होता घडते. ही संकल्पनाच नवी होती. जानेवारी २००१ मध्ये विकीपीडि याची सुरुवात जेम्स् वेल्सने (James Wales) केली व केवळ दहा वर्षांतच विकिपीडिया हा ज्ञानकोश प्रचंड मोठा झाला. विकि-पीडीया तयार करणाऱ्यांची, जिला शेवटच नाही अशी फार मोठी साखळी तयार झाली. कोठलीही गोष्ट विकी-पीडियात मिळते व ती बऱ्याच प्रमाणात विश्वासार्ह असते, अशी भावना सर्व समाजात निर्माण झाली.

कम्प्युटरवरून आपण जशी माहिती मिळवतो तशीच कम्प्युटरवर माहिती, फोटो, व्हिडिओ घालण्याची सवय लोकांना लागली. बऱ्याच जणानी आपले ब्लॉग कम्प्युटर-वर तयार केले. फेसबुकवर आपल्या गटातील लोकांशी विचारविनिमय करता येऊ लागला. ऑर्कुटसारख्या सोशल साइट्स तयार झाल्या.

इंटरनेट क्रांतीमुळे जसे ब्लॉग तयार झाले, फेसबुक तयार झाले, सोशल साइट्स तयार झाल्या, तसेच आउट-

सोर्सिंगही सुरू झाले. १९८९ साली भारतात पहिले आउटसोर्सिंग जॅक बेल्शने (Jack Welch) ने केले. कम्प्युटरशिक्षित मोठे मनुष्यबळ असलेल्या भारत व चीन या देशांनी आउटसोर्सिंगने आपली अर्थव्यवस्था नुसती सक्षम किंवा बळकट केली नाही, तर बदललीही.

या नव्या अर्थव्यवस्थेत सप्लाय चेनला किंवा पुरवठा साखळीला किती महत्त्व आहे, हे वॉलमार्ट Wallmart या प्रसिद्ध आंतरराष्ट्रीय दुकान-साखळीच्या उदाहरणावरून स्पष्ट होते. ग्राहकाला हवी असलेली वस्तू कमीत कमी वेळात, योग्य किमतीला व योग्य दर्जाची कशी मिळेल. याचा ध्यासच वॉलमार्टने घेतला. त्याकरिता १२ मैल लांबीची पट्टापद्धती किंवा कन्व्हेअर बेल्टपद्धती त्यांनी निर्माण केली. त्या कन्वेअर पद्धतीत कंपनी सतत सुधारणा करत राहिली. प्रत्येक पार्सलवर एक मायक्रोचिप बसवली गेली. ते पार्सल कुठे जाते याची खबरबात मिळण्याची व्यवस्था त्या कंपनीने निर्माण केली. हे सर्व नफा समोर ठेवूनच, पूर्ण व्यापारी उद्दिष्ट समोर ठेवूनच करण्यात आले. सामाजिक बांधीलकीचे कोठलेही तत्त्वज्ञान समोर ठेवण्यात आले नाही. अगदी निष्ठुरपणे, वस्तुनिष्ठपणे माणसांच्या व यंत्रांच्या कार्यक्षमतेचाच विचार केला गेला.

दुसरे उदाहरण गुगल या इंटरनेट क्रांतीला जोडलेल्या कंपनीचे घेता येईल. गुगलने माहिती व तंत्रज्ञानक्षेत्रात फार मोठे प्रशंसनीय कार्य केले आहे. गुगलचा वापर केला की कोठलीही माहिती अचूकपणे मिळते, याची खात्री सर्वांनाच असते. केवळ इंग्रजीमध्ये नव्हे, तर जगातल्या प्रत्येक महत्त्वाच्या भाषेत माहिती व ज्ञान उपलब्ध होईल, हे गुगलने पाहिले. गुगलने माहिती व ज्ञानाचे जे लोकशाहीकरण केले, ते फार महत्त्वाचे होते. या लोकशाहीकरणामुळे माणसाचा आर्थिक वर्ग, शैक्षणिक पातळी, भाषिक विभिन्नता, पैशाचे पाठबळ या गोष्टी दुय्यम महत्त्वाच्या ठरल्या. कोठलाही प्रश्न विचारावा, गुगलमध्ये त्याचे उत्तर सापडेल अशी लोकांना खात्री वाटू लागली. एका ठिकाणचा संदेश, संहिता, चित्र क्षणात दुसरीकडे जाऊ लागले. केवळ पत्रव्यवहार नव्हे, तर संहितेचे संपादनही अनेकजण एका वेळी करू शकले. व्हिडिओ–कॉन्फरन्सिंग, कम्प्युटर ग्राफिक्स, ॲनिमेशन, कम्प्युटर गेम्स यांमध्ये थक्क करण्यासारखी प्रगती झाली व सतत होत आहे. नवे तंत्रज्ञान व नवी यंत्रे तारेच्या जंजाळाविना काम करू लागली. गुगलसारख्या कंपन्यांचे महत्त्व व सर्वगामित्व सर्वांना मान्य करावे लागले. माणसाचा विकास, त्याचे स्वातंत्र्य व नवयुगाची घडण या तिन्ही गोष्टी एकाच वेळी घडत होत्या. नवी समाजव्यवस्था घडत होती.

श्रेणिव्यवस्था नसलेली समतलता 'horizatality' अस्तित्वात येत होती. या जागतिक अर्थव्यवस्थेत परस्पर-सहकार्य महत्त्वाचे ठरत होते.

या नव्या अर्थव्यवस्थेत ग्राहकांच्या अपेक्षा वाढणे स्वाभाविक आहे. हा ग्राहक माहितगार आहे, नवखा नाही हे उत्पादकाला गृहीतच धरावे लागते. या माहितगार ग्राहकासाठी आपल्या उत्पादनाची नीट माहिती देणारे विक्रेते उत्पादन करणाऱ्या कंपनीकडे असणे हा विक्रीतला महत्त्वाचा घटक झाला आहे.

नव्या अर्थव्यवस्थेतल्या तरुण ग्राहकाला आउटलूक या साप्ताहिकाने झिप्पी असे नाव दिले आहे. हा झिप्पी ग्राहक १५ ते २५ वयोगटातला आहे. तो इंटरनेटवरून वस्तूंच्या गुणवत्तेची व किंमतीची माहिती मिळवतो. तुलनात्मक दृष्ट्या कोठली वस्तू किती किंमतीला मिळते याची नीट माहिती त्याच्याकडे असते. जागतिक अर्थ-व्यवस्था व नवे तंत्रज्ञान यांविषयी त्याला माहिती आहे. आपले उद्दिष्ट काय हे त्याला नीट माहित आहे. पैसे मिळवणे व पैसे खर्च करणे याविषयी त्याच्या मनात अपराधीपणाची भावना नाही. समाजवादी समाजरचना, समता व लोककल्याणकारी राज्य या 'जुन्या' कल्पनांवर त्याचा विश्वास नाही. लोकशाही व भांडवलशाही व्यवस्थेतला हा झिप्पी ग्राहक नव्या वस्तू खरेदी करतो, ग्राहक म्हणून समाधान मिळवतो व समाजाचे नवे रूप घडवीत असतो.

या नव्या अर्थव्यवस्थेत उद्योगक्षेत्रापेक्षा सेवाक्षेत्र अधिक महत्त्वाचे झाले आहे. स्पर्धा, नवी नवी नैपुण्ये आत्मसात करणारी, अधिक बौद्धिक व भावनिक कौशल्ये असलेले लोक या अर्थव्यवस्थेला हवे आहेत.

या अर्थव्यवस्थेतला समाज अधिक लवचीक, परस्पर सहकार्य करून उद्दिष्ट्ये गाठणारा, आत्मपरीक्षण करणारा, सर्जनशील, प्रतिभावंत, कलासक्त, सहनशील वृत्तीचा

असेल, असे भविष्यकालीन समाजाचे चित्रही समोर ठेवणे शक्य आहे.

कम्प्युटर क्रांतीमुळे जागतिकीकरणाला एक वेगळे वळण मिळाले. आपल्याला माहीत असलेली गोष्ट कम्प्युटर वापरणाऱ्याला अपलोड करता येऊ लागली, कम्प्युटरवर घालता आली व कम्प्युटरवर उपलब्ध असलेली माहिती मिळवणारा हे त्याचे पॅसिव (passive) रूपच बदलले. माहिती अपलोड करता येऊ लागल्याने सूचनावहन दुतर्फा झाले. अधिक मोकळेपणा, पारदर्शिकता, सांस्कृतिक वैविध्य, लोकशाही वर्तणूक या दुतर्फा दळण-वळणाने, क्रियाप्रतिक्रियेच्या संदर्भाने वेगळ्या रूपात ही क्रांती अवतरली. उद्योगनमुने बदलले, उपभोक्तारीत बदलली 'Insularity' संकुचितता जाऊन एक वैश्विकता अस्तित्वात आली. अज्ञानाचे अंधारे कोपरे जाऊन सर्व ठिकाणांची नीट माहिती उपलब्ध झाली. या नव्या तंत्रज्ञानाने उत्पादनक्षेत्रात, उपभोक्ताक्षेत्रात व एकूणच सांस्कृतिक क्षेत्रात मोठी क्रांती घडवून आणली.

माहिती व माध्यमक्रांतीमुळे, दळणवळणाच्या अति-प्रगत साधनांमुळे विकास तर झालाच; पण काही मूलभूत प्रश्नही निर्माण झाले. आज दूरची माणसे जवळ आली आहेत. त्यांच्याशी संवाद साधणे सहज जमले आहे. पण जवळची माणसे दूरही गेली आहेत. उदा. मोबाईलचा उपयोग करणारा शेजारच्या माणसाची दखलच घेत नाही. त्याच्याशी संवाद न करता तो दूरच्या माणसाशी मोबाईलवर बोलत राहतो. संवादात मोबाईल अडथळा बनतो. हृदय-संवाद आता थांबलाच आहे. हे Age of Interruption झाले आहे. माणसाचे लक्ष यांत्रिक साधनांनी विचलित होतं. त्याची मन:शांती हरवली आहे. नव्या युगात मानसिक शांतता कशी मिळवायची, समाजस्वास्थ्य कसे मिळवायचे, नव्या दळणवळण साधनांचे दुष्परिणाम कसे टाळायचे याच्या नव्या पद्धती, नव्या युक्त्या, नव्या स्ट्रॅटेजीज कशा निर्माण करायच्या, ही आजची नवी आव्हाने आहेत. जुने अनुभव या कामी मार्गदर्शन देणार नाहीत.

नव्या वातावरणाचे रूप समजूनच या नव्या आव्हानांना सामोरे जाता येईल. संरक्षणवाद व राखीवता यांना स्थान नसल्याने, सर्वोत्कृष्टालाच संधी प्राप्त होत असल्याने समाजातल्या दुर्बल, अभागी घटकांना समाजात मानाचे स्थान कसे मिळवून द्यायचे, या आव्हानाचा विचार या समाजव्यवस्थेत करावाच लागेल. केवळ मेरिट्रॉक्रसी (Merito-cracy) आणल्याने जटिल प्रश्न सुटणार नाहीत.

मध्यमवर्ग ही एक मानसिकता आहे, विचारधारा आहे. उपभोक्तावादाच्या मर्यादा या मध्यमवर्गाच्या लक्षात येऊ लागल्यात. निसर्गाला किती ओरबाडायचे याचा विचार होऊ लागलाय. पर्यावरणवाद व हरित चळवळ अस्तित्वात आली आहे. केवळ सुखवाद व उपभोक्ता-वादासंबंधीचा पुनर्विचार गंभीरपणे होऊ लागला आहे.

जागतिकीकरण म्हणजे अमेरिकीकरण किंवा शुद्ध उपभोक्तावाद, सुखवाद नव्हे, ही जाणीव आता पसरू लागली आहे. जागतिकीकरणाला वैश्विकतेचे विलोभनीय अंगही आहे, हे लक्षात आले आहे. कानाकोपऱ्यांत पडलेले सांस्कृतिक आविष्कार या जागतिकीकरणाने समाजासमोर आले आहेत. लोकशाहीर विठ्ठल उमप, पांडवानी गीत गाणारी नीजनबाई, वारली चित्रकार जिवा यांना जागतिकीकरणाच्या युगातच पुढे येता आले; ही जागतिकीकरणाची धवल बाजू दृष्टिआड करून चालणार नाही.

अचिकित्सकपणे जागतिकीकरणाला वाईट समजणे व स्थानिक संस्कृतीविरोधी समजणे बरोबर नाही.

देशी समाजरचनेवर, देशी अर्थरचनेवर व देशी संस्कृतीवर, तिच्या विशिष्टतेवर, तिच्या वेगळेपणावर जागतिकीकरणाने आघात होतो या समजाचा पुनर्विचार करणे आवश्यक आहे.

वैविध्यता जपणे व बहुलरूपीपण जपणे या जाग-तिकीकरणाच्या सपाटीकरण या वैशिष्ट्याच्या विरोधी जाणाऱ्या गोष्टी आहेत. त्या वैविध्याचा बहुरूपीपणाचा सतत पुरस्कार करत राहिले पाहिजे. युरोकेंद्री व अमेरिकाकेंद्री अर्थव्यवस्था व जीवनशैलीपेक्षा वेगळ्या विचाराने जगायला शिकणे आता या नव्या जगात आवश्यक आहे. देशीवाद व उत्तरवसाहतवादातला युरोपविरोधी विचार, अमेरिकाविरोधी विचार आता कालबाह्य व संदर्भबाह्य झाला आहे. सर्व जगाच्या, विश्वाच्या संदर्भात विचार करणे आज आवश्यक आहे.

जागतिकीकरण ही वसाहतवादी मनोवृत्तीची नवी

टूम आहे असे न मानता त्याचा संदर्भ नवी माहिती, क्रांती व कम्प्युटरक्रांती हा आहे, त्याचे इंटरनेटशी फार जवळचे नाते आहे. हे समजून शांतपणे, समतोलपणे, वस्तुनिष्ठपणे कोठलाही अभिनिवेश न बाळगता जागतिकीकरणाचा विचार करणे आवश्यक आहे.

जागतिकीकरणाची अपरिहार्यता, जागतिकअर्थव्यवस्थेची अपरिहार्यता, माध्यमक्रांती व दळणवळण क्रांतीची अपरिहार्यता सर्वांनीच मान्य केली आहे. सर्वांचे जगणे या नव्या संदर्भातच होत आहे. त्याचा दुष्परिणाम घडवणाऱ्या ज्या बाजू आहेत त्यांना कसे सामोरे जायचे, हा मानवी समाजासमोरचा प्रश्न आहे. परस्परविचार-विनिमयाने, नवे नमुने प्रत्यक्षात आणून हे करणे शक्य आहे.

वसाहतवादी काळात युरोपीय अमेरिका जीवनशैलीचे वर्चस्व जवळजवळ ३५० वर्षे राहिले. त्यात आता बदल करून नवा समाज घडवणे, नवे नमुने घडवणे माणसाच्या हाती आहे, इतिहासाने माणसाला दिलेली ही संधी आहे असे मानून नव्या आव्हानांना सामोरे जाणे योग्य होईल. जागतिकीकरणाचे अनेक, बहुविध चेहरे, बहुविध आवाज ओळखायला आपण शिकले पाहिजे. तरच या अटळ, अपरिहार्य घटनेचे आपण स्वागत करू शकू. जशी काही हजार वर्षांपूर्वी शेतीक्रांती झाली, १८ व्या शतकात औद्योगिक क्रांती झाली व माणसाचे संपूर्ण जीवनच बदलले, तसेच या माहितीक्रांतीकडे, कम्प्युटरक्रांतीकडे, जागतिकीकरणाकडे पाहिले पाहिजे, या क्रांतीचा रस्ता कोणालाच माहीत नाही, पण त्या रस्त्यावरून माणसाला चालावेच लागणार आहे.













# भारत-पाक शांति वार्ता : आश्वासक भवितव्याकडे वाटचाल?

प्रा. विठ्ठल दहिफळे, प्रा. डॉ. मीरा फड.

फेब्रुवारी महिन्याचा शेवटचा आठवडा भारताच्या दृष्टीने अनेक अर्थांनी महत्त्वपूर्ण ठरला आहे. प्रामुख्याने सप्ताहाच्या अखेरीस अगोदरच निश्चित असलेल्या दोन अशा घटना होत्या. की ज्यांवर सर्व भारतीयांचे डोळे खिळून होते. त्यांपैकी एक म्हणजे वार्षिक अंदाजपत्रक व दुसरी म्हणजे भारत–पाकिस्तान सचिव पातळीवरील शांति वार्ता. जागतिक पातळीवर आर्थिक मंदीचा विळखा काही अंशी ढिला होत असतानाच भारतात मात्र भडकलेल्या महागाईच्या पार्श्वभूमीवर सामान्य जनतेला दिलासा देणाऱ्या अंदाजपत्रकाची लोक एकीकडे आतुरतेने वाट पाहत होते तर दुसरीकडे पुणे बॉम्बस्फोटाच्या पार्श्वभूमीवर बऱ्याच कालावधीनंतर खंडित असलेली भारत-पाक शांतिवार्ता नव्याने सुरू झाल्यामुळे शांती, सुरक्षितता व सहकार्याच्या संदर्भात ती आश्वासक भवितव्य घडवील काय, याबाबत कुतूहल होते. प्रत्यक्षात दोन्ही घटनांचा परिणाम पदरी निराशा टाकणाराच निघाल्यामुळे ये रे मागल्याचीच पुनरावृत्ती झाली आहे.

उभय देशांत पंतप्रधान वाजपेयींच्या काळात अथक प्रयत्नानंतर 'समावेशक संवादप्रक्रिया' सुरू झाली होती. परंतु २६/११ च्या मुंबईवरील हल्ल्यानंतर, जोपर्यंत पाक दोषी अतिरेक्यांवर ठोस कार्यवाही करीत नाही व आपल्या देशातील दहशतवाद्यांचे नेटवर्क नष्ट करण्यासाठी निश्चित पाउले उचलणार नाही. तोपर्यंत संवादप्रक्रिया स्थगित करण्यात आली होती. २००९ च्या जुलै महिन्यात पंतप्रधान डॉ. मनमोहन सिंग यांनी या भूमिकेत बदल करीत इजिप्तमधील शर्म-अल-शेख शहरात भारत-पाक संयुक्त निवेदन जाहीर करून शांतिवार्तेचा मार्ग खुला केला होता. त्याच प्रक्रियेचा एक भाग म्हणून भारताच्या परराष्ट्र सचिव निरुपमा राव यांच्या निमंत्रणावरून पाकिस्तानचे परराष्ट्र सचिव सलमान बशीर १३ सदस्यीय प्रतिनिधि-मंडळास घेऊन भारतात दाखल झाले. उभयतांत २५ फेब्रुवारी रोजी बातचित होऊन शांतिपूर्ण सहअस्तित्वाच्या आश्वासक भवितव्याचा मार्ग शोधण्याचा प्रयत्न झाला. त्याच्या ठीक दुसऱ्याच दिवशी भारतीयांना निशाणा करीत अफगाणिस्तानची राजधानी काबुल शहरात बॉम्बहल्ला करण्यात आला, ज्यात १६ पेक्षा अधिक लोकांना आपले प्राण गमवावे लागले आहेत. मागील २० महिन्यांत भारतीय अधिकारी व प्रतिष्ठानांना निशाणा बनवीत करण्यात आलेला हा तिसरा हल्ला होता. या हल्ल्यांमागचा उद्देश व त्याच्या करवित्याबाबत वेगळे सांगण्याची काही आवश्यकता नसली, तरी हल्ल्याचा मुहूर्त पाहता भारताला तो स्पष्ट इशाराच होता, यात दुमत नाही.

सचिवपातळीवरील भेटीत जुन्याच भूमिकांना चिकटून चर्चा झाल्यामुळे शांतिपूर्ण सहअस्तित्वाच्या दिशेने आश्वासक असे काही घडले नाही. भारताकडून मुंबई हल्ल्यास जबाबदार असणाऱ्यांविरुद्ध कठोर कार्यवाही, दहशतवाद्यांची घुसखोरी, सीमावर्ती भागात वारंवार युद्ध विरामाच्या संकेताचे उल्लंघन व काही दिवसांपूर्वी पाकिस्तानातील प्रमुख शहरांत व पाकव्याप्त काश्मीरमध्ये काही दहशतवादी संघटनांनी खुलेआम भारतविरोधी आग ओकल्याचा मुद्दा उपस्थित करून हिंसा व आतंकमुक्त वातावरणातच द्विपक्षीय सफल वार्ता शक्य असल्याची जाणीव करून देण्यात आली, तर पाकिस्तानकडून नेहमी-प्रमाणेच पाणीवाटपाचा प्रश्न व काश्मीरचे तुणतुणे वाजविण्यात येऊन काश्मीरात मानवी हक्कांच्या भारता-कडून होत असणाऱ्या उल्लंघनाबाबत चिंता व्यक्त करण्यात आली.

कोणत्याही शांतिपूर्ण वाटाघाटींची यशस्विता ही पारस्परिक विश्वासावर अवलंबून असते आणि विश्वास परस्परानुकूल कृतीच्या पायावर निर्माण होत असतो. भारत-पाकमध्ये नेमक्या या पारस्परिक विश्वासाचीच कमी आहे. उभय देशांमध्ये आजही एक मोठा गट असा आहे. की जो शांती–वाटाघाटींना निरर्थक व अपमानजनक संबोधण्यास नेहमीच तयार असतो. मूलत्त्ववादी राजकारण

अनुक्रमणिका

हा त्यांचा शक्तिस्त्रोत आहे. आक्रमकतेची धार कायम ठेवीत कोणत्याही शांति, वाटाघाटींना उधळून लावणे यातच त्यांना स्वत:च्या राजकीय अस्तित्वाच्या सुरक्षिततेची खात्री वाटत असते. यात जसे राजकीय घटक आहेत तसेच काही अराज़कीयही घटक आहेत; परंतु म्हणून वार्ता होऊ न देणे, यथास्थितीची भलावण करण्यात उभय देशांचे आहे काय? निश्चितच नाही, आजही दोन्ही देशांतील सामान्य जनतेला शांतीच हवी आहे. अलीकडेच पाकिस्तानातील जंग व भारतातील टाईम्स ऑफ इंडिया गटाने संयुक्तपणे उभय देशांत शांतिप्रक्रियेला बढावा मिळावा या हेतूने लोकमतबांधणी करण्याचा अभिनव प्रयोग केला आहे. ज्याला सामाजिक चळवळींच्या अभ्यासात 'सोशल कन्स्ट्रक्टिव्हीज्म' असे म्हणतात. नेहमीप्रमाणेच याही प्रयत्नाकडे तुच्छतेने पाहणारी माध्यमे वगळली, तर अशा प्रयत्नांचे जनतेकडून जोरदार उत्स्फूर्त स्वागत झाले पाहिजे. हवामानबदलावरील कोपनहेगनच्या परिषदेतही जगातील ४५ देशांतील ५६ वर्तमानपत्रांनी समान संपादकीयाद्वारे एकाच आवाजात आपली भूमिका मांडून कधीही न घडलेल्या सामाजिक विधायकतेचे प्रदर्शन केले होते. मानवीय प्रश्नांसंदर्भात असे वारंवार घडू लागले, तर दांभिकतेला थाराच शिल्लक राहणार नाही. दोन्ही वृत्तपत्रांनी संयुक्तपणे केलेल्या लोकमतचाचणीत ७२ टक्के पाकिस्तानी व ६६ टक्के भारतीयांनी उभय देशांत शांततापूर्ण संबंधांची गरज असल्याचे मत नोंदविले आहे. यावरून सामान्य लोकांना तणाव नको आहे, हेच सिद्ध होते. निवडक स्वार्थी लोकांच्या युद्धज्वराच्या भाषेला हे बळकट उत्तर नाही काय? ऐतिहासिक घटनांना उगाळीत विद्वेषाचे वातावरण निर्माण करण्यात काय हशील आहे? आपापसातील तणावरेषा आणखी किती काळ आपण ओढणार आहोत? शेजारील दोन देश पारस्परिक ऐतिहासिक द्वेषाचा भार सांभाळत विकास मार्गावर वाटचाल करू शकतील काय? या प्रश्नांचा व्यावहारिक पातळीवर विचार करणे उभयतांच्या फायद्याचे आहे.

शीतयुद्धाच्या काळात भावनिक राजकारणावर स्वार झालेल्या महासत्तांही ७०च्या दशकात किमान समान हितसंबंधांवर आधारलेल्या व्यावहारिक, सामंजस्यपूर्ण राजकारणाची अवस्था निर्माण होऊ शकली. भारतपाकनेही भावनाधारित राजकारणाला तिलांजली देण्याची हीच संधी आहे. वर्तमान गतिरोधाला तोडणाऱ्या शांति प्रक्रियेला भारताने आरंभ करून चांगले संकेत दिले आहेत. 'चर्चा नाही'ची भूमिका केव्हाही घातकच आहे; तर 'चर्चा होऊ शकते'ची भूमिका पर्याप्त आश्वासक आशावाद जागवत असते. त्यामुळे सध्याच्या भारत-पाक सचिवपातळीवरील संवादाचे सर्व थरांतून जोरदार स्वागतच झाले पाहिजे. आश्चर्याची बाब म्हणजे जेव्हा-केव्हा भारत-पाक औपचारिक चर्चा घडून येण्याचा मार्ग बंद झाला, तेव्हा दोन्ही देशांतील सरकारे एकमेकांवर गरळ अधिकच ओकत असतात. ज्यामुळे उरल्यासुरल्या सद्‌भावनेचीही होळी होत असते. 'शांती' हा कशाचाही पर्याय होऊ शकत नाही, हे तथ्य भावनाशील राजकारण करणाऱ्यांनी समजून घेतले तर विसंवादाचा प्रश्नच शिल्लक राहणार नाही.

उभय देशांत विसंवादाची जड असणाऱ्या दहशतवादाचा खातमा करण्यासाठी इस्लामाबादनेही कृतीतून इच्छाशक्ती असल्याचे दाखवून दिले पाहिजे. दहशतवाद्यांना आश्रय वा आधार देणाऱ्यांचा संकल्पपूर्वक मुकाबला केला पाहिजे. जगात कोणताही 'चांगला दहशतवाद' असू शकत नाही, ज्यांनी या तत्त्वाशी सौदेबाजी करण्याचा प्रयत्न केला. त्यांना अंतिमत: वाईट परिणामांना सामोरे जाण्याची वेळ आली. आज पाकिस्तान या अवस्थेतून जात आहे. दहशतवादाला राजकीय उपकरण म्हणून वापरण्याचा मोह त्या देशाने सोडून दिला पाहिजे. जी तत्त्वे निरंतर घृणा, असहिष्णुता, भय व हिंसेच्या विचार-धारेचे प्रतिपादन करतात. ती त्यांना खाऊ घालणाऱ्या हातांनाच कलम करीत असतात. हे विसरता कामा नये. डॉ. फ्रेंकेन्सटीनच्या प्रसिद्ध कथेप्रमाणे 'जे लोक दैत्याचे सृजन करतात, अशांना दैत्य नेहमीच त्यांच्या नियंत्रणात राहतील या पोकळ दिवास्वप्नात राहता येत नाही', याचे स्मरण असणे महत्त्वाचे आहे. पाकिस्तान आज नाजूक स्थितीमधून जात आहे. लोकशाही शासनाच्या समांतरपणे कार्य करणाऱ्या शक्ती तिथे प्रबळ आहेत. लष्करातील मात्तबर अभिजनमंडळी, धार्मिक क्षेत्रातील कडवे अभिजन व मूलतत्त्ववादी अतिरेकी शासनाच्या निर्णयप्रक्रियेला सातत्याने प्रभावीत करीत आहेत. अशा










स्थितीत भारताचे हित पाकमध्ये लोकतंत्रात्मक व्यवस्था मजबूत कशी होईल, यातच पाहिले पाहिजे. यात भरीस भर म्हणून अलीकडे पाकिस्तान खुद्द आतंकी हिंसाचाराने त्रस्थ आहे. सीमांतर्गत हिंसाचाराचे प्रमाण असेच सातत्याने वाढत गेले, तर तेथील लोकशाहीला मोठाच धोका निर्माण होऊ शकतो; जो एकूणच दक्षिण आशियाच्या शांती व सुरक्षिततेला घातक ठरू शकतो. अशा स्थितीत भारताचे हे कर्तव्य बनते, की समंजस शेजाऱ्याची भूमिका निभवीत पाकिस्तानला स्वभूमीवरील दहशतवाद निपटून काढण्यासाठी सर्वतोपरी सहकार्य करणे. या कामी उभय देशांनी बिनदिक्कतपणे 'दहशतवादविरोधी संयुक्त यंत्रणेचा वापर करावयास काहीच हारकत नाही; परंतु यासाठी पारस्परिक विश्वासाची नितांत गरज आहे.

पारस्परिक विश्वासाची बांधणी मुंबईवर निर्दयी हल्ला करणाऱ्यांना कठोर शासन करूनच शक्य आहे. या बाबतीत वेळोवेळी ठोस पुरावे सादर करूनही पाककडून गांभीर्यपूर्वक अपेक्षित प्रतिसाद मिळत नाही. लष्कर-ए-तैय्यबा, जमाद-उद-दावा, हिजबुल मुजाहिद्दीन आदी दहशतवादी संघटनांनी पाकभूमीचा वापर भारतात हिंसाचारासाठी वारंवार केला आहे. रस्त्यावर खुलेआम रॅली काढून भारतविरोधी विषारी प्रचार या संघटना करीत असूनही पाकसरकार मात्र डोळ्यांवर पट्टी बांधून बसले आहे. अशा कृत्यांमुळे विश्वासाचे वातावरण कसे निर्माण होऊ शकेल? आजही पाकिस्तानात दहशतवाद्यांना प्रशिक्षण देणाऱ्या ४२ संस्था कार्यरत असल्याची माहिती नुकतीच संरक्षणमंत्री ए. के. अँटोनी यांनी दिली आहे. यापुढे पाकिस्तानला दुहेरी भूमिका करता येणार नाही, जी आता-पर्यंत तो भारतासोबत करीत आला आहे. आपल्या भूमीचा वापर भारताविरुद्ध हिंसाचारासाठी होणार नाही, याची निग्रहपूर्वक खबरदारी पाकला घ्यावी लागेल, तरच शांतिवार्तांना भवितव्य आहे, अन्यथा तो एक केवळ राजकीय उपचार ठरणार आहे.

भारत-पाक शांतिवार्तांना बदलत्या आंतरराष्ट्रीय परिवेशाच्या संदर्भातही पाहणे आवश्यक आहे. मागील काही महिन्यांपासून अमेरिकाकृत अफ-पाक धोरणाचा ज्यांनी बारकाईने अभ्यास केला आहे, त्यांच्या निदर्शनास एक बाब ठळकपणे आली असेल; ती म्हणजे अफगाणिस्तानातून अमेरिकेला प्रतिष्ठित माघार हवी आहे. त्याची उघड वाच्यताही ओबामा प्रशासनाने केली आहे. अमेरिकेच्या माघारीमुळे निर्माण होणारी शक्तिशून्यता भारत-पाकने विधायक मार्गाने भरून काढावी, अशी अमेरिकेची इच्छा आहे. दक्षिण आशियातील अमेरिकेचे हितसंबंध बहुतांश त्यावरच निर्भर आहेत. या पार्श्वभूमीवर भारत-पाक तणावाची गोळणी फोडणे नाटो सदस्य राष्ट्रांसाठी अत्यावश्यक होते. भारत-पाकला चर्चेच्या व्यासपीठा-वर एकत्र आणूनच या देशांना प्रतिष्ठेने माघार घेणे शक्य होणार आहे. दुसरीकडे अफगाणिस्तानातील भारताची मानवीय मदत पाकला खुपत आहे. तर अफगाण-पाक दुर्गम भागातील तालिबान-पाक लष्करातील जुने लागेबांधे भारताच्या चिंतेत भर घालीत आहेत. इकडे अमेरिकेच्या सिनेटमध्ये पाकिस्तानला दहशतवाद्यांच्या बिमोडासाठी देण्यात आलेल्या करोडो डॉलर्सच्या निधीचा हिशोब मागण्याची भाषा केली जात आहे. याला प्रतिसाद म्हणून अलीकडेच डझनभर तालिबानी म्होरक्यांची धरपकड व हत्यासत्र पाकमध्ये सुरू आहे. जेव्हा केव्हा देण्यात आलेल्या निधीच्या ऑडिटची मागणी केली जाते, तेव्हा पाकिस्तानात धरपकडीचे सत्र सुरू होते, हे आता नवे राहिले नाही. लष्करातील काही बडे धेंड व राजकीय पुढारी याच निधीवर मालामाल झाल्याचीही चर्चा सुरू आहे. भारत मात्र या निधीबाबत नाखूशच आहे. कारण पूर्वानुभव असा सांगतो, की पाक अमेरिकन मदतीचा वापर भारताविरुद्धच्या सामरिक हितसंबंधांसाठी करीत आला आहे. या पार्श्वभूमीवर भारत-पाकवर संवादासाठी आंतरराष्ट्रीय समुदायाचा दबाव वाढला आहे.

भारतही 'चर्चा नाही' च्या भूमिकेवर दीर्घकाळ अडून राहू शकत नाही. आजच्या स्थितीत एकीकडे संवादाचा मार्ग खुला करीत आणि दहशतवादाच्या समस्येला अधिकाधिक फोकस करीत भारत पाकिस्तानला क्षेपणास्त्रे नियंत्रण क्षेत्रासंदर्भात वाटाघाटींच्या मंचावर आणू शकतो, ज्याला शस्त्रनियंत्रणाच्या भाषेत सामरिक शस्त्रे प्रतिबंधक करार (SALT) असे म्हटले जाते. पाककडून याला अनुकूल प्रतिसाद मिळाला, तर दक्षिण आशियाच्या इतिहासात तो सुदिन नोंदला जाईल; अन्यथा शीतयुद्धाच्या कालखंडात अमेरिकेने सोव्हिएत युनियनला शस्त्रस्पर्धेला भाग पाडून

लोळविले, तसे तौलनिक GDP पाहता भारताला नजीकच्या काळात पाकिस्तानला या मार्गाने संपविणे फारसे अशक्य नाही. तूर्तास संसदीय शांति वार्तेचे भवितव्य नजीकच्या काळात पाकिस्तान दहशतवादाच्या प्रश्नासंदर्भात सकारात्मक प्रतिसाद कसा देतो व मुंबई हल्ल्याची पुनरावृत्ती होईल काय? यांसारख्या भविष्यलक्ष्यी समस्यांवर अवलंबून आहे. उभयपक्षी शांती व सुरक्षिततेच्या अनुषंगाने अपेक्षित सकारात्मक हस्तक्षेपाची कामना करू या.

**संदर्भ सूची :**


१. Shamshad Khan (2010). '*Media's Contstructivism and the India-Pakistan Peace Process*', IDSA COMMENT www.idsa.in
२. P. K. Upadhyay (2010) : '*Afgahan Factor behind moves to revive-talks between India and Pakistan*', IDSA COMMENT, www.idsa.in
३. 'पाकिस्तान के साथ विदेश सचिव स्तरीय संवाद के समापन पर विदेश सचिव का प्रेस वक्तव्य', www.meahind.nic.in
४. 'दक्षिण एशिया में शांति, सुरक्षा और विकास का भारत का विजन' विषय पर विदेश राज्यमंत्री डॉ. शशि थरुर द्वारा १७ वा लाल बहादूर शास्त्री स्मारक व्याख्यान – (११/०१/२०१०)
५. 'बातचीत की शुरुआत तो हुई' – संपादकीय विचार, नवभारत टाइम्स (२७ फेब्रुवारी २०१०)
६. 'भारत-पाक विदेश सचिवों की मुलाकात आज', दैनिक भास्कर (२५ फेब्रुवारी २०१०)
७. विठ्ठल दहिफळे (२००९) : 'भारत-पाक संयुक्त निवेदन – एक लेखाजोखा', परिवर्तनाचा वाटसरू, अंक ८, १६ ते ३१ ऑगस्ट २००९.













# अडोळी येथील प्रथम वैदर्भीय मराठी समाधि लेख

डॉ. प्रदीप शा. मेश्राम/प्रा. धिरज या. चौधरी

प्रस्तुत समाधिलेख अडोळी गावी उजेडात आला असून हे गाव वाशीम जिल्हा मुख्यालयाच्या दक्षिण-पश्चिमेस रिसोड मार्गावर १३ कि.मी. अंतरावर आहे. नवीन शिलालेख सापडल्याची सर्वप्रथम बातमी एका मराठी दूरचित्रवाहिनीद्वारे प्रसारित झाली होती. या माहितीच्या आधारे प्रस्तुत लेखक द्वयाने अडोळीचा शोध घेऊन या स्थळी प्रत्यक्ष भेट दिली. हा लेख अलीकडे उजेडात आला नसून पूर्वीपासून या परिसरातील लोकांना ज्ञात होता; इतकेच नव्हे, तर त्यावर उल्लेखित १६४४ या कालोल्लेखामुळे तो या वर्षीचा आहे असाही समज होता. याचा उलगडा दूरचित्रवाहिनीचा संवाददाता, त्या परिसरातील कुणीही इतिहासप्रेमी किंवा मराठी भाषा तज्ज्ञांनी घेण्याचा प्रयत्न मात्र केला नाही, हे दुर्भाग्यच म्हणावे लागेल. पूर्वी हा परिसर अकोला जिल्ह्यांतर्गत येत होता, पण जिल्हा गॅझेटीयर, कनिंघमचा रिपोर्ट किंवा तत्सम साहित्यात या लेखाचा साधा उल्लेखही नाही. वाशिम नवनिर्मित जिल्हा असून अडोळी गावाचा अंतर्भाव तालुका जिल्हा वाशिममध्ये होतो.

अडोळी हे गाव पश्चिम विदर्भात नागपूरहून सुमारे २५० कि.मी. अंतरावर एक प्राचीन वसाहत असून जुन्या अवशेषांवर वसलेले साधारण गाव आहे. गावाच्या एका टोकावर 'मोठा मठ' नावाची व अन्यत्र 'छोटा मठ' नावाची गढी अस्तित्वात आहे. प्रस्तुत मराठी समाधि लेख मोठा मठ उंचवट्यावर असून ते १० ते १२ फूट उंचीवर आहे. या गढीवर तीन समाध्या अस्तित्वात असून पैकी दोन समाध्या लहान, साध्या स्वरूपात उघड्या काळ्या दगडात बांधलेल्या आहेत. त्यावर पादुकांचे (Foot Prints) अंकन मात्र पाहायला मिळते. याव्यतिरिक्त सर्वात मोठी व मुख्य समाधी उंचवट्यावरच असून ती 'सुरेश पुरी'ची समाधि या नावाने ओळखली जाते. या समाधीचे बांधकाम मोठ्या स्वरूपाचे आहे. समाधीवरील छत्राचा भाग घुमटाकार असून त्यावर मुस्लिम स्थापत्याची छाप आढळते. ही समाधी उत्तराभिमुख आहे. आत जाण्यासाठी लहान प्रवेशद्वार आहे. प्रस्तुत दोन लेख या मुख्य समाधीवर व जवळच आहेत.

समाधीच्या पायथ्याशी अलीकडेच महादेवाचे मंदिर बांधले आहे. मंदिरपरिसरातच तीन लहान लोखंडी तोफा व त्यानजीक प्रचंड दगडजाते आहे. महादेवाचे मंदिर बांधताना तीन समाध्या असलेला भाग मूळ स्वरूपात ठेवून बाकी परिसर सपाट करून घेतल्यामुळे समाध्या तेवढ्या उंचवट्यावर आढळतात. येथे चढणे-उतरणे ही एक मोठी कसरत आहे. हा शिलालेख अनेक वर्षे भूमिगत असल्याने याचा निर्देश मराठी लेखांच्या याद्यांमध्ये कोठेही आढळत नाही. तेव्हा हे संपादन प्रथमच होत आहे.

**वर्णन :**

प्रथम लेख समाधीच्या अधिष्ठानावर (Platform) पश्चिम दिशेच्या कॉर्नरवर मोठ्या अक्षरांत कोरला असून एका ओळीचा आहे. तो दूरूनच सहज दृष्टीस पडतो व नीट वाचता येतो इतका स्पष्ट असल्यामुळे त्याचा अधिक विचार केला नाही.

दुसरा लेख मात्र समाधीच्या मागील भागाच्या अधिष्ठानालगत कोपऱ्यात काळ्या पाषाणांतील एका वेगळ्या चौकोनी शिळेवर अंकित असून तो सात ओळींचा आहे. लेखाच्या काही ओळी जमिनीखाली मातीत दडल्या आहेत. सभोवतीची माती खोदून काढली, तेव्हा त्याचे वाचन, छायाचित्रण व स्टॅम्पेज घेणे शक्य झाले. उत्कीर्ण लेखाचे स्वरूप साधारण प्रतीचे आहे. शिळा खडबडीत असली तरी लेख मात्र पुष्कळ स्पष्ट आहे. जमिनीखाली दडलेल्या भागावर चुनखडीचे आवरण चढल्यामुळे काही अक्षरे अस्पष्ट झाली आहेत. ही शिळा ६४ सें.मी. उंच, ४० सें.मी. रुंद व १० सें.मी. जाड आकारमानाची आहे.

अनुक्रमणिका








**अक्षरवटिका, लेखनपद्धती आणि भाषा :**

प्रस्तुत दोन्ही लेखांची भाषा मराठी असून ते देवनागरी लिपीत कोरलेले आहेत. दुसऱ्या लेखातील ओळ क्र. ३ मध्ये 'धि' करिता 'दि' (समादि < समाधि) व ओळ क्र. ४ मध्ये 'श' करिता 'स' (सके < शके) प्रयोग केल्याचे दिसून येते.

देवनागरी लिपीतील लेख क्र. १ ची अक्षरे आधुनिक म्हणजे ४०-५० वर्षांआधीची वाटतात. तर लेख क्र. २ मधील अक्षरांपैकी 'र' हे अक्षर प्राचीनत्व दर्शविते.

**कालनिश्चिती :**

लेख क्र. २ मधील ओळ क्र. ४ मध्ये 'सके १६४४' चा स्पष्ट उल्लेख आहे. हा शक काळाचा उल्लेख असून आधुनिक कालगणनेनुसार तो इ.स. १७२२ होईल. साधारणतः प्राचीन शिलालेखांत सहसा दिवस, तारीख, मास वगैरेचा उल्लेख येतो. परंतु प्रस्तुत लेखात असा उल्लेख केल्याचे दिसून येत नाही.

लेख क्र. १

पाठ – ओम् सुरेश पुरी

लेख क्र. २

पाठ – १. सुरेश पुरी, २. गोसावी या, ३. ची समाधी, ४. सके १६४४, ५. भट्ट – पततक, ६. – कलपुरी गोसावीच, ७. र – – जमसकाल

**आशय :**

प्रस्तुत लेखाचा उद्देश 'सुरेश पुरी' नावाच्या गोसावी यांची समाधी शके १६४४ (इ.स. १७२२) मध्ये बांधल्याचे नमूद करणे हा आहे. ही समाधी कदाचित त्याच्या मूलाने किंवा उत्तराधिकाऱ्याने बांधली असावी. कारण लेखाच्या सहाव्या ओळीत 'कलपुरी गोसावीच' असे वाक्य येते. येथील प्रथम अक्षर अस्पष्ट असल्यामुळे त्यांचे नाव सांगता येत नाही. पुरी हे आडनाव मात्र आहे. परंतु गोसावी यांच्या मागे पुरी हे उपपद लावतात. यावरून स्पष्ट होते. की बहुतेक त्याच्या पुत्राने किंवा शिष्याने ही समाधी आपल्या वडिलांच्या किंवा गुरूच्या स्मृतिप्रीत्यर्थ बांधली असावी.

सुरेश पुरी हा गोसावी होता यात शंका नाही. कारण लेखाच्या दुसऱ्या व सहाव्या ओळीत 'गोसावी' नावाचा शब्द आलेला आहे. गोसावी संप्रदायाचे विदर्भातच नव्हे तर संपूर्ण भारतात वास्तव्य होते. गोसाव्यांची परंपरा फार प्राचीन काळापर्यंत मागे जाते. गोसावी या गोसाई, गुसाई, गोस्वामी ही सर्वनामे गोस्वामिन् या संस्कृत शब्दावरून निघाली आहेत. गोसावी हा एक यतीचा वर्ग असून भारतात त्यांची संख्या बरीच मोठी होती व आहे. यात शैवपंथी आणि वैष्णवपंथी असे दोन प्रमुख वर्ग आहेत. गोसावीवर्ग 'मठ' करून राहत. त्यात काही वैवाहिक असत, तर काही ब्रह्मचर्याचे पालन करणारे असत. मध्ययुगातील गोसावी यांच्या समाध्या मोठ्या प्रमाणात विदर्भात आढळतात. ह्या समाध्या भंडारा शहरात, नागपूर जिल्ह्यातील अदासा येथे, अमरावती जिल्ह्यातील नांदगाव खण्डेश्वर या मंदिर आवारात तसेच नांदेड जिल्ह्यातील माहूरगड इत्यादी स्थळी मोठ्या प्रमाणात आढळतात.

प्रस्तुत समाधी लेख व येथील परिसरातील ज्ञात माहितीवरून लक्षात येते, की येथे 'मोठा मठ' नावाचा सूरेश पुरी यांचा मठ होता व तो विवाहित असावा. या मठाचा तो मठाधीश होता. तसेच तो शैव पंथाचा अनुयायी होता.

**चर्चा व महत्त्व :**

अडोळी समाधि लेखाचे महत्त्व त्यातील शकोल्लेख, भाषा व आशय अशा सर्वच दृष्टींनी लहान असल्याने किंवा लेखनविशेष असे सांगण्यासारखे नसले, तरी एक-दोन गोष्टी नमूद करणे जरुरीचे वाटते. प्रत्यक्ष लेखातील कालनिर्देश शक १७२२ चा असला, तरी तो सदोष असल्याने खरोखर १७२३ चा ठरतो. हा शकलेख खोदल्याचा नसून सुरेश पूरी नावाच्या गोसावीने समाधी घेतली त्या प्रसंगाचा आहे.

या लेखातील मराठी भाषेचा १८ व्या शतकातील उतारा त्रोटक किंवा फुटकळ स्वरूपाचा असला, तरी जुन्या मराठीची मोडणी कळण्यास मदत होते दुसरा विशेष होय.

लेखातील आशयाचे महत्त्व गोसावी समाजाच्या व ऐतिहासिक दृष्टीने मात्र अनन्यसाधारण आहे. मराठी भाषेचे उगमकालीन व प्राचीन स्वरूप आणि तत्कालीन समाजाची संस्कृती जाणून घेण्याच्या दृष्टीने ताम्रपट व शिलालेख यांचे महत्त्व सर्वज्ञात आहे. मराठी कोरीव








लेखात अनेक प्रकार आहेत. त्यातील समाधि लेख एक आहे. समाधीवर कोरलेले लेख उत्तर काळात पुष्कळ मिळतात. प्राचीन काळातील असा एकच लेख आळंदी येथे (शके ११३९) प्राप्त झाला आहे. अडोळीचा हा परिसर १८ व्या शतकाच्या पूर्वार्धात नेमका कोणत्या राज्याचा भाग होता, याचा शोध घेणे आवश्यक वाटते. कान्होजी भोसल्याचे बंड आणि रघुजीची सेनासाहेब पदावर नियुक्ती या परिवर्तनाच्या काळात वऱ्हाडात बरीच धामधूम माजली. वऱ्हाडचा सुभा मोगलांचा, परंतु दक्षिणेचा सुभेदार या नात्याने निजामाच्या ताब्यात होता. आज वाशिम जिल्हा विदर्भाचा भाग असला, तरी पश्चिम विदर्भात मोडतो. हा प्रदेश पूर्वी वऱ्हाड या नावाने ओळखला जात असे.

महाराष्ट्र शासनाने २८ जातींना भटक्या जमाती म्हणून घोषित केले आहे. गोसावी त्यांतील एक जात आहे. भटक्या जाती कोणाला म्हणावे याबाबत तज्ज्ञांत गंभीर मतभेद असले, तरी काही जाती राष्ट्रव्यापी आहेत. गोसावी ही त्यांतील एक आहे. नागपूर-वऱ्हाड प्रांताचा विचार केला तर महत्त्वाची जात म्हणजे गोसाव्यांची होय. छत्रपती शिवाजीमहाराजांच्या द्वितीय राज्याभिषेका-बाबत निश्चलपुरी गोसाव्याने आग्रह धरल्यामुळे या संप्रदायाचा मराठी राज्याशी जवळचा संबंध आला. काहींनी तर सावकारी आणि व्यापारधंद्यात प्रवेश केला होता. नागपूरकर भोसल्यांच्या इतिहासात दशनामी संप्रदायाच्या गोसाव्यांनी मोठी कामगिरी बजावली आहे. हंसापुरीनामक गोसावी एक सावकार होता. त्याने भोसलेराजाला कर्ज दिल्याची इतिहासात नोंद आहे. रघुजींच्या मृत्यूनंतर त्याने भोसले बंधूंच्या यादवीत मुधोजीची बाजू घेतली व कर्जवसूलीचा प्रयत्न केला. कर्जफेड न झाल्यास ओरिसाची सुभेदारी मिळावी, असाही त्याने प्रयत्न केला. हंसापुरी नागपुरात ज्या वस्तीत राहत होता, तो भाग आजही हंसापुरी वार्डच्या नावाने ओळखला जातो. गोसावीसंप्रदाय सर्वत्र गुरु-चेला पद्धतीने संघटित होता. मठाचे प्रमुख विशिष्ट पद्धतीने मठाधीशाची निवड करीत. या गोसाव्यांचे मठ व्यापारी मार्गावर मध्य आणि उत्तर भारतात पसरलेले आहेत. भक्ताची दक्षिणा हेच आपले बीजभांडवल समजणाऱ्या गोसाव्यांच्या धार्मिक, सामाजिक स्वरूपामुळे राज्यापासून आणि सामान्य गुन्हेगारापासून त्यांचा बचाव होत असे. प्रस्तुत लेखाचा मागोवा घेतला तर गोसावी संप्रदायाचा वेगळा इतिहास लिहिला जाऊ शकतो, इतका मोठा आवाका त्यामागे दडलेला आहे. त्या निमित्ताने महाराष्ट्रियन संस्कृतीची अनेक अंगे दृग्गोचर होऊ शकतील, हे सांगणे वावगे ठरू नये.

**संदर्भ ग्रंथ :**

१. तुळपुळे श. गो. (संपा.) प्राचीन मराठी कोरीव लेख, पुणे विद्यापीठ प्रकाशन, १९६३.

२. अकोला व वाशिम जिल्हा गॅझेटीयर.

३. गद्रे प्रभाकर, अठराव्या शतकातील वैदर्भीय समाज, नागपूर, २००९.

४. कोलारकर, श. गो. व पुरंदरे गो.मा., नागपूर राज्याचा अर्वाचीन इतिहास, नागपूर, २००५.

५. काळे, या.मा., नागपूर प्रातांचा इतिहास.

६. Russel, R. V. & Hiralal R. B., Tribes & Castes of Central Provinces of India.

७. Hastings J. Encyclopaedia of Religion & Ethics, 1955.












## पुस्तक परीक्षण

# मर्ढेकरांची महात्मता

डॉ. मंजूषा सावरकर

(मर्ढेकरांची महात्मता – प्रा. कृष्णा चौधरी, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे; पृष्ठे – २२८; मूल्य – रु. १५०/-)

'मर्ढेकरांची महात्मता' हा प्रा. कृष्णा चौधरी यांच्या सत्तावीस लेखांचा संग्रह कॉन्टिनेंटल प्रकाशनाने प्रकाशित केला. संग्रहाला लेखकाचे संक्षिप्त मनोगत व सुप्रसिद्ध समीक्षक वसंत डहाके यांची विवेचक प्रस्तावना आहे. मलपृष्ठावर डॉ. द. भि. कुलकर्णी यांचा ग्रंथाचे प्रतिपाद्य प्रमेय विशद करणारा अर्थपूर्ण अभिप्राय. 'मर्ढेकर आणि वामन मल्हार' या लेखात लेखकाने वा. म. जोशी यांनी मर्ढेकरांच्या वाङ्‌मयीन महात्मतेला प्रस्तावना लिहिली व मर्ढेकरांचा गौरव केला, तरी मर्ढेकरांनी विशद केलेली कलानिर्मितीची व आस्वादाची प्रक्रिया संपूर्णपणे समजून घेतली नाही. लेखनपूर्व व लेखनगर्भ आत्मनिष्ठा, ज्ञानात्मक व भावनात्मक तादात्म्य व कैवल्यपूर्ण मूल्यभाव या सर्व अवस्थांचा एकात्म विचार केल्यास मर्ढेकरांच्या नवीनतेचे व मौलिकतेचे दर्शन घडते, असे स्पष्ट केलेले आहे. 'मर्ढेकरांची सौंदर्यमीमांसा व प्रभाकर पाध्ये या लेखात पाध्यांनी मर्ढेकरांचा सौंदर्यविचार समजून घेतला तरी सौंदर्यभावनेविषयी मर्ढेकरांबाबत मतभेद व्यक्त केला आहे. जीवशास्त्रीय भावनेचेच सौंदर्यभावनेत (बोधनेत) रूपांतर होते, असे पाध्ये मानतात तर मर्ढेकर सौंदर्यभावना जीवशास्त्रीय भावनेपेक्षा कोटिशः (कॅटॅगरिकली) भिन्न मानतात. पाध्ये यांनी मर्ढेकरांच्या विचारांचे कुलसाम्य, मर्ढेकरांचा सौंदर्यविचार, माध्यमविचार व लयबंधाची संकल्पना यांचे सविस्तर विवेचन केले असले, तरी पाध्ये यांची समीक्षा प्रतिशोधाच्या भावनेतून तर निर्माण झाली नाही ना, अशी शंका व्यक्त केली आहे. ती पाध्ये यांचा 'सौंदर्यानुभव' ग्रंथ वाचून खरी वाटते. 'मर्ढेकर व कुरुंदकर' या लेखात लेखकाने कुरुंदकरांनी मर्ढेकरांचा सौंदर्यविचार यांत्रिक आहे असे म्हटले, त्याचे साधार निराकरण केलेले आहे. लेखक म्हणतात, कुरुंदकर म्हणतात त्याप्रमाणे मर्ढेकरांची सौंदर्यसंकल्पना यांत्रिक नाही. काव्यातील नावीन्याचा उगम कालसापेक्ष नसून प्रतिभासापेक्ष प्रतिभेच्या नावीन्यातून अपूर्व कलेची निर्मिती होत असते असे म्हणणारे मर्ढेकर यांत्रिक व त्यांच्या साहित्यसमीक्षेचे सारे स्वरूपच वरवर विचार करणारे व उपरे कसे?" (पृष्ठ ३९) 'मर्ढेकर आणि मुक्तिबोध : सौंदर्यविचार' या लेखात या दोन्ही समीक्षकांचे साम्य दाखवताना लेखक म्हणतात 'मर्ढेकर व मुक्तिबोध यांनी विशद केलेल्या काव्यनिर्मिती प्रक्रियेत एक महत्त्वपूर्ण साम्य म्हणजे मुक्तिबोधांनी मर्ढेकरांच्या लयतत्त्वाला. लयतत्त्व हे निसर्गतत्त्व असून ती कलेची अवश्योपाधी असून ते कलेचे व्यवच्छेदक लक्षण नाही असे प्रतिपादन केले आहे. मर्ढेकर मात्र लयतत्त्व हे विश्वव्यापी ते सृष्टीत व कलेत असल्यामुळे आपल्याला सौंदर्यप्रतीती येते असे मानतात मुक्तिबोधांनी पदार्थविज्ञान व रसायन-शास्त्रातील थर्मोडायनॅमिक्सच्या सिद्धान्ताने ऊर्जेच्या सम-रूपायन सिद्धान्ताद्वारे मानुषतेचा सिद्धान्त विशद करताना साहित्यातील एकार्थाला प्रमुख केंद्र कल्पिले आहे. मर्ढेकरांनीही भावानुभूतीतील लयबद्ध घटकातून एकार्थाचाच सौंदर्यप्रत्यय येतो असे म्हटलेले आहे. (पृष्ठ ४५) 'मर्ढेकर आणि मे. पुं. रेगे' या लेखात रेगे यांनी मर्ढेकरांच्या सौंदर्यभावनेचे तार्किक खंडन करून अजाणता त्यांच्या सौंदर्यतत्त्वाचा 'लयतत्त्वाचा स्वीकार कसा केला' हे विशद केले. रेगे यांची भूमिका तार्किक तर मर्ढेकरांची चिंतनशील सर्जनशील कलावंताची हे स्पष्ट केले आहे. 'मर्ढेकर, कुसुमावती आणि दभि' या लेखात मर्ढेकरांच्या सौंदर्य-विचारावर कुसुमावती देशपांडे यांनी, यांत्रिक व लयीचे पद्यबंध शोधणारे' असा आक्षेप घेतल. त्याचे निराकरण मर्ढेकरांचे मूळ विवेचन देऊन दभिंनी कसे केले हे विशद केले आहे. 'मर्ढेकरांचा सौंदर्यविचार आणि पाटणकर, या लेखात पाटणकरांनी कलेला एकसत्त्वतर्का-भास, कुलसाम्य व द्विधृवात्मक सिद्धान्ताच्या कसोट्या

अनुक्रमणिका

लावून कलास्वरूप शास्त्राला लौकिकवादी दृष्टिकोणातून मागे नेले याचे विवेचन आहे, तर 'मर्ढेकरांचे टीकाकार भ्रांत कोण' या लेखात डॉ. गोखले यांनी निरवयव म्हणजे अर्थमुक्त संवेदना व सावयव वस्तू म्हणजे लयबद्धता हे मर्ढेकरांचे गोखले यांनी मांडलेले मर्ढेकरी आकलन कसे अपूर्ण आहे याचे स्पष्टीकरण आहे. 'मर्ढेकरी सौंदर्यसू द्विदल' या लेखात द.भि.च्या मर्ढेकरांनी मांडलेल्या सौंदर्यविचाराच्या विश्लेषणाची प्रशंसा करूनही लेखकाने मर्ढेकरांच्या व द.भि.च्या कलानिर्मितीविषयी मांडलेल्या विचाराविषयी मतभेद व्यक्त केलेला आहे. उदा. 'केशवसुतांच्या काव्य-निर्मिती' प्रक्रियेबद्दलचा द. भि. यांचा अन्वय लेखकाला पटलेला नाही. तर मर्ढेकरांनी तुकारामाला आशयाच्या बाबतीत आधुनिक संबोधले तेही मान्य होण्याजोगे नाही. तुकारामाच्या अभंगांतही नावीन्य व मौलिकता आहे. असे ग्रंथलेखकाला वाटते. केशवसुता-पेक्षा बालकवी दभिंना श्रेष्ठ वाटत असले, तरी ग्रंथलेखकाला वाटत नाही असे द्विदलच्या लेखावरून वाटते. 'सौंदर्य शास्त्राचे स्वरूप' या प्राचार्य पी. डी. चौधरी यांच्या ग्रंथाबाबत व या ग्रंथाला डॉ. सुभाष सावरकर यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेतील विचाराबाबत ग्रंथलेखकाचे कला-निर्मिती व आस्वाद प्रक्रियेविषयी काही मतभेद जाणवतात. हे 'भारतीय साहित्यशास्त्र' व 'सौंदर्य आणि साहित्य' याच्या आधारे लेखकाने स्पष्ट केले आहे. ग्रंथलेखकाची भूमिका ग. त्र्यं. देशपांडे, बा. सी. मर्ढेकर आणि द. भि. कुलकर्णी यांच्या विचारांचे संस्कार पचवणारी व निर्मिति प्रक्रिया लौकिकाभिन्न प्रक्रिया मानणारी आहे. 'मर्ढेकरांचे काव्य-शास्त्र: एक सौंदर्यशास्त्रीय आकलन' या लेखात डॉ. अक्षयकुमार काळे यांनी मर्ढेकरांच्या सौंदर्यविचाराचा लयतत्त्वाचा संकोच कसा केला याचे विवेचन असून मर्ढेकरांनी कलेची श्रेणी लावली, प्रतवारी लावली नाही. इतर ललितकला ह्या इंद्रियसंवेदनांचा प्रत्यय देणाऱ्या पण साहित्यकला ही मानसगोचर असल्यामुळे अर्थावर आधारलेली श्रेष्ठ कला आहे. इंद्रियसंवेदनेतून विचार प्रस्फुरित करणारी साहित्यकला असल्यामुळे तर मर्ढेकरांनी 'सौंदर्य आणि साहित्य' असा ग्रंथ लिहिला. 'मर्ढेकरांची कविता अस्तित्ववादाची गंगोत्री या लेखात अर्थशून्यता असंगतता, एकाकीपणा या जीवनातील अस्तित्वाच्या जाणिवांचे प्रतिबिंब कसे पडले असून चित्रे, कोलटकर, डहाके यांच्या कवितेतील जाणिवांचा अस्तित्ववादी जाणिवेतून शोध घेतलेला आहे. 'प्रास्ताविक काही कवितांचे' या लेखात 'माझा अभंग माझी ओवी' या कवितेत मर्ढेकरांनी आपल्या नाठाळ गाथेची भूमिका कशी विशद केली हे प्रतिपादन आहे. मर्ढेकरांची कविता लिहिली गेली तेव्हा दु:ख भोगणारी पिढी जन्माला आली नव्हती. या ग्रंथातील चवदा समीक्षालेख मर्ढेकरी सौंदर्य-शास्त्रावरील आक्षेपांचे निरसन करून मर्ढेकरी सौंदर्यसंबोध विश्लेषण करणारे, तर उरलेले तेरा लेख मर्ढेकरांचा सौंदर्यविचार आत्मनिष्ठा, ज्ञानात्मक तादात्म्य व कैवल्यपूर्ण मूल्यभावातून साहित्यकृतीला महात्मता कशी प्राप्त होते, याचे विश्लेषण करणारे आहेत. मर्ढेकरांच्या सौंदर्यविचाराला ज्ञानात्मक इंद्रियसंवेदनप्रतिमांचे अधिष्ठान आहे. एका संवेदनेपोटी अनेक विचार व अनेकसंवेदनेपोटी एक विचार या सौंदर्यविचारातील मध्यवर्ती सूत्राने लेखकाने राव सांगता देव कुणाला, गोंधळलेल्या अन् चिंचोळ्या, कणा मोडला निश्चलतेचा, काळ्या बंबाळ अंधारी, नव्या मनूतील गिरिधर पुतळा, झोपली ग खुळी बाळे, जिथे मारते कांदेवाडी, पांडुरसंध्या चौथ्या प्रहरी, या दु:खाच्या कढईची गा, असे काहीतरी व्हावे व प्रास्ताविक व उप-संहार आणखी काही कवितांचा इ. कवितांचे आत्मनिष्ठा, तादात्म्य कैवल्यपूर्ण मूल्यभाव व महात्मता या मर्ढेकरी सौंदर्यविचारांच्या पार्श्वभूमीवर विश्लेषण केले आहे. विश्लेषण करताना मर्ढेकरी सौंदर्यविचार–लयतत्त्वविचार-संबंधाचा संबंध अशी औचित्यपूर्ण एकात्म भूमिका घेतल्या-मुळे विश्लेषणातून संश्लेषण घनरूप झाले आहे. या ग्रंथाचे दोन भाग पडतात. एक मर्ढेकरी सौंदर्यसंबोध लयबंध विशद करणारा तात्त्विक समीक्षेचा (लाँग) व सर्जनशील आस्वादक समीक्षेचा (पारोल) सौंदर्यवादी, रूपवादी, संरचनात्मक समीक्षा कलाकृतीतील आशय व अभिव्यक्ती दोन्ही एकात्म पातळीवर उलगडून दाखवते. कलाकृतीतील सौंदर्यानुभूतीतील लयबंधात्मक घटक प्रतीक, प्रतिमा व व्यंग्यार्थातून, प्रसरणशील शब्दातून साहित्यकृतीचा लयबंध उलगडून दाखवण्याचे कार्य रूपवादी समीक्षा करते. कारण कलाकृती ही वस्तुनिष्ठ असून

तिच्या संरचनेतच तिचा सौंदर्यसंबोध व सौंदर्यप्रत्यय घनीभूत झालेला असतो. एका अर्थाने वा. ल. कुलकर्णी, मर्ढेकर, वसंत दावतर, द. भि. कुलकर्णी, गंगाधर गाडगीळ व माधव आचवल यांनी सौंदर्यवादी समीक्षेतून साहित्यकृतीचे मूल्यमापन केले. याच पद्धतीचा अवलंब प्रा. कृष्णा चौधरी यांनी मर्ढेकरी सौंदर्यसंबोधाचे तात्त्विक व आस्वादक या दोन्ही पातळ्यांवर विश्लेषण करण्याचा प्रयत्न या ग्रंथात केलेला आहे. या ग्रंथाच्या प्रस्तावनेत वसंत डहाके यांनी मर्ढेकरांच्या सौंदर्यशास्त्रात त्यांची कविता आहे, आणि त्यांच्या कवितेत त्यांचे सौंदर्य आहे असे विधान करता येणार, नाही असे म्हणून आपला प्रांजळ विरोध नमूद केलेला आहे. 'भंगु दे काठिण्य माझे' या कवितेवरून मर्ढेकरां निर्मिती प्रक्रियेवर प्रकाश टाकला आहे असे चौधरी म्हणतात, हे मर्ढेकरांना मान्य होण्यासारखे विधान नाही असे लिहिलेले आहे. या ग्रंथातील प्रा. चौधरी यांच्या विश्लेषणातून तसे जाणवत नाही. भंगु दे काठिण्य माझे या ओळीत मर्ढेकरांनी 'स्व'चे अहंकेंद्री व्यक्तित्व गळून पडून ज्ञानात्मक तादात्म्यामुळे स्वचा विलोप होऊन विश्वसौंदर्याशी ते तादात्म्य पाहून निर्मितिक्षम होऊ दे असेच म्हटले असावे. कलावंताच्या भावनासंगती रचना-संगतीची सांगड विश्वरचना सौंदर्यरचनेशी जुळते तेव्हाच कलाकृती निर्माण होते असे मर्ढेकरी विश्लेषण प्रा. चौधरी यांनीही केलेले आहेच. मे. पुं. रेगे यांचा सर्व भर सौंदर्यशास्त्राच्या तार्किक विवेचनावर असल्यामुळे मर्ढेकरांसारख्या सर्जनशील कलावंताचा सौंदर्यविचार ते आकलन करू शकले नाही, हे आता नव्याने सांगण्याची गरज नाही. 'मर्ढेकर, द.भि. व गोखले' या लेखात मर्ढेकरांऐवजी द. भि. वर लक्ष आहे, हेही विधान योग्य वाटत नाही. मर्ढेकरांचा सौंदर्यसंबोध द.भि.नी चिंतन-शील विचारातून मांडूनही गोखल्यांनी द. भि.ची कुत्सित शब्दांत निर्भत्संना केली, त्यावर हा लेख उतारा आहे. तत्त्वज्ञान व संगीत या विषयांचा व्यासंग नसतानाही साहित्यरसिक वाङ्मयाचा आस्वाद घेऊ शकतो, हे खरे नाही काय? डॉ. पुष्पा भावे यांचे याबाबतीतील मत पाहू "समीक्षेत वाङ्मयीन तत्त्वाचे विश्लेषण करीत असताना वा एखाद्या वाङ्मयकृतीचे रसग्रहण करताना चित्रकला, संगीत, शिल्प आदी कलांच्या संदर्भातून स्पष्टी-करण करण्याचा जो यत्न असतो, तो प्रस्तुत आहे काय? या इतर कलांचा संदर्भ दृष्टान्तापलीकडचे काही कार्य करू शकतो काय? हे संदर्भ केवळ कलाकुसर म्हणून येतात की, त्यामागे काही तात्त्विक बैठक असते? या संदर्भातील तात्त्विक बैठक प्रस्थापित कशी करणार? कारण, मूलभूत सौंदर्याचे कलेनुसार भेद होत नसले, तरी भिन्न कलांचे माध्यम, ती रसिकापर्यंत संक्रांत होण्याची प्रक्रिया या भिन्न असल्याने विश्लेषणात कोठेही साम्य निर्माण होण्याची शक्यता दिसत नाही. या विचारामागे ज्याचे स्वरूप इंद्रियसंवेदनात्मक नाही, त्या वाङ्मयाने इंद्रियसंवेदनानिर्मितीची करामत करावी, अशी साहित्या-विषयीची प्राथमिक समजूत असते काय? (मराठी टीका – संपादक वसंत दावतर – मर्ढेकरयुगातील मराठी टीका : काही प्रश्न – पुष्पा भावे, पृ. १२६)

मर्ढेकरी सौंदर्यविचाराचे सार समजणे म्हणजे मर्ढेकरांनी कलेच्या निर्मितिप्रक्रियेत केलेला द्रव्य व माध्यम भेद यातील भेद समजणे. द्रव्य म्हणजे साधनसामग्री शब्द व माध्यम म्हणजे कलावंताची सौंदर्यानुभूती. ह्या द्रव्यमाध्यमभेदामुळेच इतर कला इंद्रिय संवेदनाचा प्रत्यय देणाऱ्या, तर साहित्यकला अर्थग्रंथीतून मानसिक अर्थ-संपृक्तीमुळे अनेकार्थसूचक (Ambiguity) व लय-बंधात्मक स्वरूपाची असते. हा लयबंध प्रसरणशील अन्वयात्मक शब्दांतून व्यक्त होत असल्यामुळे भावनानिष्ठ अर्थसूचक असतो. भावनानिष्ठ अन्वयात्मक शब्दांतून कधी संवादात्मक तर कधी विरोधात्मक तर कधी सम-तोलात्मक सौंदर्याकृती आकारास येते. मर्ढेकरी सौंदर्यविचार समजून घेताना मर्ढेकरांनी द्रव्य व माध्यम यांत फरक केलेला आहे. द्रव्य म्हणजे शब्दाची सामग्री व्दा माध्यम म्हणजे कलावंताची सौंदर्यानुभूती. शब्दांतील भावनात्मक अर्थसंबंध व त्या अर्थसंबंधातील लयनिष्ठ गुंफण या दोन घटकांतून वाङ्मयीन महात्मता निर्माण होते. मर्ढेकरांनी इंद्रियसंवेदनेचा प्रत्यक्ष प्रत्यय देणारी व एकाच संवेदनेवर आधारलेली कला ही प्रथमश्रेणी मानली. साहित्यकलेत प्रत्यक्ष इंद्रियसंवेदना व्यक्त न होता फक्त संवेदनांच्या प्रतिमा व्यक्त होतात. त्यामुळे साहित्यकला ही संकरकला म्हटले असले, तरी प्रतवारी लावताना साहित्यातील सौंदर्या-नुभव मानसिक, अनेक संदर्भसूचक व लयबंधात्मक

अनेकार्थसूचकतेमुळे असल्यामुळे श्रेष्ठकला मानलेली आहे. अन्यथा त्यांनी सौंदर्य आणि संगीत किंवा सौंदर्य आणि चित्रकला असा ग्रंथ लिहिला असता. मर्ढेकरी सौंदर्यसंबोधाबाबत द्रव्य व माध्यम यांतील भेद पुरेसा आकलन न झाल्यामुळे मर्ढेकरांना आकृतिवादी, यांत्रिक, गणिती व अभिजनवादी संबोधण्याचा खटाटोप अनेक मान्यवर समीक्षकांनी केलेला आहे. मर्ढेकरी समीक्षेचे सम्यक आकलन के. नारायण काळे, वसंत दावतर, द. भि. कुलकर्णी व माधव चवल यांना झालेले आहे. प्रस्तुत ग्रंथात असाच प्रयत्न प्रा. कृष्णा चौधरी यांनीही केलेला आहे. मर्ढेकरांचा सौंदर्यविचार व त्यांचे ललित साहित्य यात परस्परसंबंध आहे, असे एक सूत्र या ग्रंथात व्यक्त झालेले आहे. या ग्रंथाबाबत मलपृष्ठावर मराठीतील सर्जनशील समीक्षक द. भि. कुलकर्णी यांनी दिलेला अभिप्राय मला महत्त्वाचा वाटतो. "प्रस्तुत ग्रंथात त्यांनी मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र व त्यांचे काव्य यांचा अन्योन्य संबंध प्रत्ययपूर्णतेने उलगडून दाखविला आहे... मर्ढेकरांच्या अभ्यासकांना विचारप्रवृत्त करण्याचे सामर्थ्य प्रा. कृष्णा चौधरी यांच्या ग्रंथात खचितच आहे" एक उत्कृष्ट समीक्षा ग्रंथ मराठी समीक्षेला दिल्या-बद्दल कॉन्टिनेंटल प्रकाशनाच्या अमृता कुलकर्णी यांचे अभिनंदन!



---

## वाचकांचा पत्रव्यवहार

१)

डॉ. मधुकर वाकोडे
।।अमेय।। शाहूनगर,संगई प्लॉट,
अंजनगाव सुर्जी, ४४४७०५ जि. अमरावती

प्रति,

सन्मानीय डॉ. सुरेशराव भृगुवार

स. न.

'नवभारत' मधील मागच्या महिन्यात (फेब्रुवारी २०११) मर्ढेकरांच्या कवितांवरील शैलीशास्त्रीय लेख आणि 'नवभारत' मे २०११ च्या अंकातील 'कुसुमाग्रज शैलीचे अंतरंग ...' हे दोन्ही लेख आवडले. आपल्या अभ्यासपूर्ण लेखांबद्दल मन:पूर्वक अभिनंदन.

खरे तर मराठीच्या साहित्यक्षेत्रात शैलीशास्त्रीय दृष्टिकोण असलेला अभ्यासक आपणाशिवाय क्वचितच कुणी असेल. तशी कधी कधी आपली याद येते. आज तीव्रपणे आली म्हणून पत्र प्रपंच.

कळावे,

आपला,
डॉ. मधुकर वाकोडे

---

२)

माधवी देसाई
४०४, खणभाग
जुना स्टेशन रस्ता,
सांगली - ४१६ ४१६.

प्रति,

डॉ. सुरेश भृगुवार,

स. न.

'नवभारत' मासिकाचा मे २०११ चा 'कुसुमाग्रज' अंक वाचला. त्यातील 'कुसुमाग्रजशैलीचे अंतरंग : 'कोलंबसाचे गर्वगीत'च्या प्रकाशात' हा तुमचा लेख वाचला आणि काही दिवसांतच तुमचा फोन आला. त्यानंतर हा लेख दुसऱ्यांदा वाचला आणि तुम्हाला पत्र लिहायचे ठरविले.

प्रत्येक व्यक्तीची आवडी-निवडीची-नावडीची अशी एक यादी असते; तशीच माझीही आहे. त्या यादीत कुसुमाग्रज आद्यस्थानी आहेत. त्यांची कविता, त्यामागील प्रेरणा, भूमिका, त्यांनी साहित्यसंमेलनाध्यक्षपदावरून केलेले भाषण सर्वच मला अत्यंत प्रिय आणि आदरणीय आहे. कवी आणि माणूस म्हणून मला ते महान वाटतात. असो.

तुमच्या 'नवभारत' मधील लेखात तुम्ही कुसुमाग्रजांच्या 'कोलंबसाचे गर्वगीत' कवितेचे शैलीविश्लेषण शास्त्रीय सप्रमाणतेने केले आहे. त्याचबरोबर कुसुमाग्रजांची अद्‌भुत प्रतिभा, शब्दसामर्थ्य, शब्दविवेक यांबद्दलचे विवेचनही मला आवडले. एकाच कवितेतून कविराजांचा शब्दविवेक, त्यांच्या शैलीचा तेजोमय पारा, प्रतिभा यांचे मार्मिक दर्शन तुम्ही घडविले आहे. साहित्याच्या शैलीशास्त्रीय अभ्यासावर तुमच्या लेखणीची हुकुमत आहे, हे तुमच्या या लेखाबरोबरच तुम्ही










सांगितलेल्या तुमच्या पीएच. डी.च्या अभ्यासविषयावरून आणि प्रस्तुत लेखाखाली दिलेल्या संदर्भ टिपांवरून जाणवते.

कुसुमाग्रजांच्या काव्यवैशिष्ट्यांबद्दल लिहिताना तुम्ही कोणतीही 'पोज' न घेता लेख लिहिला आहे, म्हणूनच मला तो आवडला. कुसुमाग्रजांच्या कवितेतील तुम्हाला जाणवलेल्या उणिवाही तुम्ही संयतपणे सांगितल्या आहेतच; पण संपूर्ण लेखात कविराजांबद्दलचा उचित आदरही जाणवतो; पण त्यात साहित्यशरणता नाही, हे जाणीवपूर्वक सांगावेसे वाटते एकूणच तुमचा लेख आवडला हे सांगण्यासाठी हे पत्रप्रयत्न ... असो, तुम्ही मागितलेल्या 'त्रिदल' – या बॅ. पी. जी. पाटील गौरवग्रंथातील मिलिंद स मालशे, स. गं. मालशे यांचा 'साहित्याच्या अभ्यासाची पद्धती' या लेखाची छायाप्रत (एकूण पृष्ठे ८८ ते १४५) या पत्रासोबत पाठवीत आहे. त्याची पोच अवश्य द्यावी. हा ग्रंथ शोधण्यासाठी बरेच प्रयत्न करावे लागले; पण शेवटी तो मिळाला ही बाब महत्त्वाची. असो.

माधवी देसाई

---

## लेखकांचा परिचय


❋ **अरुण विनायक जातेगांवकर व वासंती अरुण जातेगांवकर**

डॉ. अरुण जातेगांवकर व वासंती जातेगांवकर ह्या दोघांना अमेरिकेतील विद्यापीठांतून गणितात डॉक्टरेट पदव्या आहेत. त्या दोघांनी गणितावरील पाश्चात्त्य नियतकालिकांमधून संशोधनात्मक अनेक लेख लिहिले. २००१ साली सेवानिवृत्त होताना अरुण जातेगांवकर न्यूयॉर्कमधल्या फोर्डम् युनिव्हर्सिटीमध्ये गणिताचे प्राध्यापक होते आणि वासंती जातेगांवकर जर्सीमधल्या सीटन हॉल युनिव्हर्सिटीमध्ये संगणकशास्त्राच्या प्राध्यापिका होत्या. सेवानिवृत्त झाल्यापासून ती दोघे महाभारतावर वाचन व लेखन करत आहेत.

E-mail : vasantijategaonkar@yahoo.com

❋ **प्रा. डॉ. अशोक कृष्णाजी जोशी**

इंग्रजी या विषयाचे प्राध्यापक (निवृत्त.) गोवा विद्यापीठ. सौंदर्यशास्त्र, समीक्षा, तत्त्वज्ञान या विषयांचे अभ्यासक.

***पत्ता :*** १२ सिंगबाल बिल्डिंग, टोक, करंझोले, गोवा ४०३ ००२. दूरध्वनी : ०८३२–२४६२९८१.

❋ **प्रा. विठ्ठल दहिफळे**

प्राध्यापक, राज्यशास्त्र विभाग वरिष्ठ, पीपल्स कॉलेज, नांदेड. साधना मासिक व दै. लोकमत यामध्ये लेख प्रकाशित.

***पत्ता :*** पीपल्स कॉलेज, नांदेड (मराठवाडा). भ्रमणध्वनी : ९९२२६५४४३२.

❋ **प्रा. डॉ. मीरा फड**

लोकप्रशासनाच्या प्राध्यापिका, यशवंत महाविद्यालय, नांदेड.

***पत्ता :*** यशवंत महाविद्यालय, नांदेड. भ्रमणध्वनी : ९८५०४४८६८३.

❋ **डॉ. प्रदीप शा. मेश्राम / प्रा. धीरज या. चौधरी.**

नागपूर विध्यापीठात पुरातत्त्वशास्त्राचे प्राध्यापक

***पत्ता :*** प्रा. भा. इ. सं. व. पुरातत्त्व विभाग, पी.जी.टी.डी.कॅम्पस,
रा.तु.म.नागपूर विद्यापीठ, नागपूर - ४४० ०३३.

❋ **डॉ. मंजूषा सावरकर**

मराठी विषयाच्या प्राध्यापिका, पटवर्धन हायस्कूल ॲण्ड ज्युनिअर कॉलेज, सिताबर्डी, नागपूर; डांगोरा व भोवंडा हे कथासंग्रह प्रसिद्ध.

***पत्ता :*** २८५, 'शिव', श्री महालक्ष्मीनगर, (न्यू नरसाळा रोड) नागपूर - ३४. भ्रमणध्वनी : ९४२३४११२५६.

## लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

रजिस्टर क्र. **11697/57**



हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका




